पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला.

# नवीन मराठी पुस्तकें.

---

## करुणराघव.

हें वर लिहिलेल्या पुस्तकमालेपैकीं प्रथम नंबरचें आहे. हें प्रसिद्ध कवि **भवभूति** याचें सर्वोत्तम नाटक **उत्तररामचरित** याच्या आधारानें लिहिलेलें असून यांत करुणरस इतका ओतप्रोत भरला आहे कीं, तो पाषाणाला देखील द्रव आणील. कागद, छपाई व बांधणावळ सुरेख असून याचीं डेमी १२ पेजी सांच्याचीं २६० पृष्ठें आहेत. याची किंमत १ रुपया आहे.

## ललितवत्सराज.

याचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग केले आहेत. प्रसिद्ध **श्रीहर्षदेव** यांनीं केलेल्या **रत्नावली** नाटिकेचा आधार घेऊन पूर्वार्ध तयार केलें आहे. व त्याच्याच **प्रियदर्शिका** नांवाच्या नाटिकेच्या आधारानें उत्तरार्ध तयार केलें आहे. दोहोंचाही नायक एक असल्यामुळें अशी योजना केली आहे. कागद, छपाई व बांधणावळ सुरेख आहे. याच्या प्रत्येक अर्धाचीं डेमी द्वादशपत्री १३० वर पृष्ठें झालीं आहेत. प्रत्येक अर्धाची किंमत ८ आणे आहे.

## चारुदत्त आणि वसंतसेना.

हें प्रसिद्ध महाकवि **श्रीशूद्रक** राजा याच्या **मृच्छकटिक** प्रकरणाच्या आधारें तयार केलें आहे. यांत पौराणकाळाच्या नंतरची या देशाची स्थिति व्यक्त केली आहे. कागद व छपाई वगैरे सुरेख असून याचीं डेमी द्वादशपत्री पृष्ठें सुमारें ३०० आहेत. किंमत १ रुपया.

## प्रणयिमाधव.

हें प्रसिद्ध महाकवि **श्रीभवभूति** याच्या **मालतीमाधव**नामक प्रकरणाच्या आधारानें तयार केलें आहे. यांत कुलीन कन्यकेचें वर्तन उत्तम प्रकारें दाखविलें आहे. यांत अनेक प्रकारच्या मसलती आहेत. कागद व छपाई उत्तम असून डेमी द्वादशपत्री सांच्याचीं पृष्ठें सुमारें ३०० झालीं आहेत. किंमत १ रुपया.

## आर्यचाणक्य.

हें प्रसिद्ध महाकवि **विशाखदत्त** याच्या **मुद्राराक्षस** नांवाच्या नाटकाधारानें तयार केलें आहे. यांत राजकीय भानगडी, अनेक मसलती, कारस्थानें फारच सुरेख रीतीनें वर्णिलीं आहेत. कागद छपाई वगैरे उत्तम असून डेमी द्वादशपत्री पृष्ठें सुमारें ३००. आहेत. किंमत १ रुपया.

## विदग्धपुरूरवा.

हें महाकवि **श्रीकालिदास** याच्या **विक्रमोर्वशी**नामक नाटकाच्या आधारें तयार केलें आहे. यांत राजा **पुरूरव्याचें** वर्णन केलें आहे. कागद व छपाई सुरेख असून डेमी द्वादशपत्री सांच्याचीं पृष्ठें २०० आहेत. किंमत १४ आणे ठेविली आहे.

## राजा अग्निमित्र.

हें प्रसिद्ध महाकवि **श्रीकालिदासकृत मालविकाग्निमित्र** नाटकाच्या आधारानें तयार केलें आहे. यांत **अग्निमित्र** राजाचें चरित्र मोठ्या सुरेख रीतीनें वर्णन केलें आहे. कागद व छपाई सुरेख असून डेमी द्वादशपत्री पृष्ठें सुमारें २२० वर होतील. किंमत १ रुपया.

## शिवदिग्विजय.

### अथवा

## तरुणशिवाजी नाटक.

यांत छत्रपति **शिवाजी** महाराज यांच्या तरुणपणच्या म्हणजे त्यांनीं **तोरणाकिल्ला** घेतल्यापासून तों त्यांना राज्याभिषेक होईपर्यं-

तच्या कृतीचें फारच सुरस रीतीनें वर्णन केलें आहे. कागद व छपाई सुरेख असून डेमी द्वादशपत्री सांच्याचीं ३०० पृष्ठें आहेत. किंमत १ रुपया.

## सद्गुणीसगुणा.

### (स्त्रियांस अत्यंत उपयोगी)

ही एक फारच चटकदार व मनोरंजक गोष्ट आहे. कागद व छपाई सुरेख असून डेमी द्वादशपत्री सांच्याचीं पृष्ठें ६०. किंमत ४ आणे.

## बापू गोखले यांचें चरित्र.

ह्या इतिहासप्रसिद्ध शूर पुरुषाचें चरित्र फारच मनोवेधक व रसाळ आहे. कागद व छपाई सुरेख असून डेमी द्वादशपत्री सांच्याचीं पृष्ठें २०० आहेत. किंमत १२ आणे.

## सुंदरी आणि वसंतसेन.

### भाग १, भाग २, भाग ३.

हें पुस्तक मूळ हिंदीभाषेंत रचिलेल्या एका अत्युत्तम प्राचीन ग्रंथाच्या आधारें तयार केलें आहे. यांत स्त्रिया आपलें पातिव्रत्य दृढ निश्चयानें कोणत्या प्रकारें रक्षण करितात, याचें उत्तम प्रकारें वर्णन केलें आहे. भाग पहिला, किंमत ४ आणे; भाग २ रा, किंमत ६ आणे; भाग ३ रा, किंमत १० आणे.

## संगीत ययातिनाटक.

यांतील पद्यांची रचना कै. अण्णा किर्लोसकर यांच्या संगीतासारखीच आहे. नाटक फार साधें व गोड आहे. पृष्ठें ८०. किंमत ८ आणे.

## मनोहर नाटक.

या नाटकाची रचना शेक्सपीयरच्या नाटकाच्या धर्तीवर आहे. यांत करुण व हास्य रस प्रधान आहेत. हें शोकपर्यवसायी नाटक आहे. किंमत १२ आणे.

# सुशिक्षित स्त्री.

स्त्रीशिक्षण कसें पाहिजे या संबंधानें या पुस्तकांत उत्तम सूचना आहेत. सुशिक्षित कुटुंबाची स्थिति उत्तम प्रकारें दाखविली आहे. किंमत १० आणे.

# सुशीलगृहस्थ नाटक.

हें गोल्डास्मिथ् नांवाच्या विख्यात इंग्लिश ग्रंथकाराच्या 'गुड्नेच्-र्डमॅन्' नाटकाचें भाषांतर आहे. हें विद्वान् लोकांस फार पसंत पडलें आहे. किंमत १२ आणे.

# सुंदराबाई.

ही एक चटकदार व स्त्रियांस उपदेश होण्यासारखी लहानच गोष्ट आहे. किंमत १ आणा.

# चातुर्यरत्नावलि.

## भाग १, भाग २, भाग ३, भाग ४.

या पुस्तकाचे लहान लहानच पण सुंदर असे चार भाग असून त्यांत मौजेच्या व बोधपर अशा ८० गोष्टी आहेत. प्रत्येक भागाची किंमत अर्धा आणा.

# बृहत्कथासागर.

हा ग्रंथ ऐतिहासिक असून मनोरंजक आहे. या ग्रंथांत पौराणिककाळानंतर या भरतखंडाची राजकीय, सामाजिक, धर्म व विद्या यांच्या संबंधानें स्थिति कशी होती, तिचें उत्तम प्रकारें वर्णन केलें आहे. बहुतेक संस्कृत नाटकांस व काव्यग्रंथांस आधारभूत हाच ग्रंथ आहे. मूळसंस्कृत ग्रंथ फारच उत्तम आहे. त्याचें हें भाषांतर आहे. याचे एकंदर १० भाग होणार आहेत. प्रत्येक भागाची किंमत २०४.

**वासुदेव मोरेश्वर पोतदार,**

**कांदेवाडी, मुंबई.**

Potdar's Moral and Interesting Book Series.

No. III

# LALITAWATSARÁJ,

*(Part II.)*

*Translated from Sanskrit*

by

**PANDIT VÁMAN SHÁSTRI ISLÁMPURKAR,**

AND

PUBLISHED BY

**WASUDEV MORESHVAR POTDAR.**

Bombay:

PRINTED AT THE JOINT-STOCK PRINTING PRESS.

1889.

*Price 8 Annas.*

पोतदारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला.

---

नंबर ३.

---

# ललितवत्सराज,

## ( उत्तरार्ध. )

---

हें पुस्तक संस्कृत ग्रंथाच्या आधारें

**पंडित वामन शास्त्री इसलामपुरकर**

यांणीं मराठींत तयार केलें.

---

अहिणअराअ क्खित्ता महुअरिआ वामएण कामेण ।
उत्तम्मइ पत्थन्तीं दट्ठुं पिअदंसणं दइअं ॥ १ ॥

---

**वासुदेव मोरेश्वर पोतदार**

यांणीं

मुंबईंत

“ धी जॉइन्ट-स्टॉक ” छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

---

सन १८८९.

---

**किंमत ८ आणे.**

# प्रस्तावना.

**ललितवत्सराज** या ग्रंथाचें पूर्वार्ध नुकतेंच प्रसिद्ध कर-ण्यांत आलें असून सांप्रत हें उत्तरार्ध वाचकांस सादर करण्यांत येत आहे. पूर्वार्धाच्या प्रस्तावनेंत सांगितल्या-प्रमाणें हें अर्ध प्रसिद्ध महाकवि **श्रीहर्ष** अथवा राजा ह-**र्षदेव** याणें केलेल्या **प्रियदर्शिका**नामक नाटिकेच्या आधारानें तयार केलें आहे. यांत **अंग**देशाचा राजा **दृढवर्मा** याची कन्या जी **प्रियदर्शिका** तिच्याशीं **वत्सराजा**नें विवाह करून घेतल्याची कथा फार सुरस रितीनें वर्णन केली आहे. **वत्सराजाचें** चरित्र फारच मोठें आहे. **श्रीहर्षा**नें आपल्या दोनही नाटिकांत तें समग्र वर्ण-न करण्याचा प्रयत्न केला नसून त्याचा एक भाग—अर्थात् **रत्नावली** आणि **प्रियदर्शिका** यांच्याशीं त्याणें विवाह कसे करून घेतले, एवढ्याचेंच वर्णन केलें आहे. वस्तुतः **रत्नावली** आणि **प्रियदर्शिका** दोनीही अगदीं स्वतंत्र आ-हेत व त्यांतील नायिका ह्या **वत्सराजा**च्या विवाहित स्त्रिया होत्या, तरी त्यांतून पट्टराणीची* पदवी एकी-लाहि नव्हती. त्या केवळ उपभोगार्थ करून घेतलेल्या बायका होत्या. तेव्हां **रत्नावली** आणि **प्रियदर्शिका** ह्या दोनही नाटिकांचा नायक एकच असून नायिका

---

* **वत्सराजा**च्या स्त्रिया पुष्कळ होत्या तरी त्यांत **वासवदत्ता** हीच पट्टराणी होती. **मगध**राजाची कन्या **पद्मावती** हीही वडील स्त्री नव्हती; तरी तिचा मान पट्टराणीप्रमाणेंच होता. वस्तुतः **रत्नावली** आणि **प्रियदर्शिका** ह्या दोघीही राजकन्याच होत्या; पण त्यांचा तसा मान नसण्याचें कारण गूढ राजकारस्थान हेंच होय.

मात्र भिन्न आहेत, तरी त्या गौण स्त्रिया आहेत व दोनही नाटिकांचा कर्ताही एकच आहे; ह्मणून आह्मी **ललितवत्सराज** हा एकच ग्रंथकरून त्याचीं दोन अर्धें कल्पून त्यांत त्यांचा समावेश केला आहे.

आतां **रत्नावली**चा पूर्वार्धांत आणि **प्रियदर्शिके**चा उत्तरार्धांत समावेश केला, ही योजना बरोबर नाहीं असें कदाचित् कोणी ह्मणेल, व **प्रियदर्शिके**च्या अगदीं आरंभींच्या कथाभागावरून तिचा पूर्वार्धांत समावेश करणें हेंच योग्य होतें असेंही कदाचित् कोणास वाटेल; पण सूक्ष्म दृष्टीनें पाहतां आह्मीं केलेली योजना हीच योग्य आहे असें कबूल करावें लागेल. कारण, **दृढवर्म्यानें** आपली मुलगी **वत्सराजा**ला देण्याचा निश्चय केला, त्यावेळीं **वत्सराज** अविवाहित होता. **वासवदत्तेचें** त्यानें हरण केलें ही गोष्ट त्यानंतर झाली, इतकेंच नव्हे तर **पद्मावती-**शीं देखील त्याचा यावेळीं विवाह झाला होता.* ह्या विवाहाच्या मसलतींतच **यौगंधरायणानें** **रत्नावली**चा पिता सिंहलद्वीपाधिपति राजा **विक्रमबाहु** याजकडे—'**वासवदत्ता लावाणकांत** जळून गेली, आतां तुमची मुलगी द्या '† ह्मणून मागणी केली. व त्याप्रमाणें बापानें **वत्सराजा**कडे **रत्नावली**ची रवानगी केली असतां ती वाटेंत वादळ होऊन समुद्रांत पडली. तेथें **कौशांबी**च्या एका व्यापाऱ्याच्या हातीं लागली असून लवकरच ती **वत्सराजा**च्या येथें

---

* यासंबंधानें ज्यांला विशेष खात्री करून घ्यावयाची असेल त्यांनीं पुढें भाग ३ यांतील ५१ व्या पृष्ठावरचें **वसंतकाचें** भाषण अथवा त्याचें संस्कृत मूळ वाचावें.

† याविषयीं याच ग्रंथाचें पूर्वार्ध पृष्ठ ३ पहा.

आली, आणि तिच्याशीं त्याचा विवाह झाला; तेव्हां एकंदरींत या गोष्टीला फार दिवस लागले नाहींत. पण प्रियदर्शिकेच्या संबंधानें तसें ह्मणतां येत नाहीं. आधीं तिला पुष्कळ दिवस विन्ध्यकेतूच्या घरीं रहावें लागलें. नंतर ती वत्सराजाच्या घरीं येऊन पोहोंचली, तरी त्यावेळीं ती लग्नास योग्य झाली नव्हती,* म्हणून तिला संगीतशाळेंत घातली होती; व ती लग्नाला योग्य झाल्यावर तिचा कोणाशींतरी विवाह करावा असा राजाचा विचार होता; पण रत्नावलीचें तसें नव्हतें. ती वत्सराजाच्यायेथें आली त्यावेळींच उपवर होती; व ती राजाच्या घरीं आल्यावर लगेच तिचा विवाह झाला. यावरून एकंदरींत विचार करून पाहतां—रत्नावली आणि प्रियदर्शिका यांतून आधीं कोणाचा विवाह झाला, याविषयीं मूळांत स्पष्ट असा कांहींच उल्लेख नाहीं, तरी वर सांगितलेल्या कारणांवरून प्रियदर्शिकेचा विवाह रत्नावली-च्या मागाहून झाला असावा असें उघड दिसतें, म्हणूनच आह्मीं याग्रंथांत तशी योजना केली आहे.

मूळग्रंथांच्या कर्त्याचें नांव श्रीहर्ष होतें यांत तर कांहीं संशय नाहींच; पण तो कोणचा श्रीहर्ष याचा मात्र विचार केला पाहिजे. कारण, ज्यांला श्रीहर्ष ह्मणतां येईल असे हर्ष नांवाचे राजे कनोज आणि काश्मीर या उभय देशांत निर-निराळ्या काळीं झाले होते. व या दोघांकडेही रत्नावली इत्यादि ग्रंथांचें कर्तृत्व कांहीं लोक लावतात. तेव्हां त्यांतून खरा कर्ता कोण याचा येथें विचार केला पाहिजे, ह्मणून येथें प्रथम त्या दोघांचेंही संक्षिप्त चरित्र देऊन

---

* याविषयीं पुढें पृष्ठ २१ यावरील राजाचें भाषण पहा.

पुढें त्यांतून कर्तृत्व कोणाकडे येतें याचा विचार करूं. वस्तुतः हा विचार याग्रंथाच्या पूर्वार्धाच्या प्रस्तावनेंतच केला पाहिजे होता;पण त्यावेळीं विशेष सवड नसल्यामुळें कर्त्याच्या संबंधानें सुक्ष्म विवेचन करतां आलें नाहीं.

**काश्मीर**च्या **श्रीहर्षा**चा पिता राजा **कलशदेव** हा सुमारें ८ वर्षें राज्य करून मरण पावला, तेव्हां त्याणें **उत्कर्षा**ला गादीवर बसविलें होतें. त्याला राज्यावर बसविलें हें पाहून **श्रीहर्षा**चा धाकटा बंधु **विजयमल्ल** याणें मोठें बंड केलें. **उत्कर्षा**च्या अंगीं तितका पराक्रम नसल्यामुळें भयभीत होऊन—**सहजा*** नांवाच्या आपण जनानखान्यांत घातलेल्या राखेला बरोबर घेऊन—तो आपल्या महालांत जाऊन बसला. व आतां पुढें परिणाम चांगला होणार नाहीं असें वाटल्या-वरून त्याणें कात्रीनें आपल्या गळ्याच्या शिरा कापून घेऊन आत्महत्या केली !

याप्रमाणें २२ दिवस राज्य करून **उत्कर्ष** परलोकवासी झाल्यावर, **विजयमल्ला**च्या साह्यानें **श्रीहर्ष** हा **काश्मीर**-चा राजा झाला.† ह्याचें चरित्र मोठें चमत्कारिक आहे.

---

***सहजा** ही वेश्या होती. **उत्कर्षाला** ती विशेष आवडल्याव-रून त्याणें तिला आपल्या जनानखान्यांत घातली होती. **काश्मीरांत** त्यावेळीं तशी चाल होती; पण चमत्कार हा कीं, **उत्कर्ष** मेला त्यावेळीं प्रत्यक्ष त्याची राणी **कय्या** हिणें उघडपणें दुसऱ्या पुरुषाचा आश्रय केला; आणि **सहजे**नें-सर्व कुलस्त्रियांला माना खालीं घालण्यास लाव ण्याकरतांच कीं काय, पूर्वीचा तिचा यार राजा **हर्षदेव** नको ह्मणत असतांही,—**उत्कर्षा**च्या चितेंत उडी टाकली !

† पूर्वार्द्धाच्या प्रस्तावनेंत आह्मीं मूलग्रंथाचा कर्ता **श्रीहर्ष** हा **काश्मीर**चा राजा असें लिहिलें आहे, तें केवळ सामान्य समजु-तीला अनुसरून आहे असें समजावें.

**काश्मीर**देशाचा प्रसिद्ध इतिहासकार **कल्हण** यानें आपल्या **राजतरंगिणी**च्या सातव्या तरंगांत ८७४ श्लोकांपासून १७४० श्लोकांपर्यंत ह्मणजे सुमारें ८६६ श्लोकांनीं याच्या कारकिर्दीचें वर्णन केलें आहे. **हर्षदेवा**च्या* चरित्राच्या संबधानें तो असें ह्मणतो कीं, "या राजाची कारकीर्द जशी स्पृहणीय होती तशीच ती वर्ज्यही होती. जशी ती सर्वांला वंद्य होती, तशीच निंद्यही होती. जशी ती मान्य, आशा करण्यास योग्य व स्मरणीय होती, तशीच ती उपहास करण्यास योग्य, त्याज्य व शोचनीयही होती." सारांश, दुर्गुण आणि सद्गुण यांचा अगदीं संकर झाल्यामुळें **हर्षदेवा**ची उत्तम राजांत गणना करावी किंवा अधमांत गणना करावी याचा निर्णय करणें फार कठीण आहे. त्यानें आपल्या राज्यांत पुष्कळ सुधारणा केल्या; मोठमोठ्या विद्वान्, पंडित, व कवि वगैरे गुणीलोकांला उदार आश्रय दिला; रयतेचीं सुखसाधनें वाढविलीं; अतिशय दानधर्म केला; अनेक धर्मशाळा, मठ, देवालयें, अग्रहार वगैरे पुष्कळ चांगलीं चांगलीं कृत्यें केलीं, यावरून त्याला उत्तम ह्मणतां आलें असतें; पण त्या बरोबरच त्याणें रयतेला अनेक प्रकारें लुटलें, असंख्य अनन्वित कृत्यें केलीं, पुष्कळ देवळें, मठ, धर्मशाळा इत्यादिकांचा सत्यानास केला.† नेहमीं अ-

---

* **रत्नावली**, **प्रियदर्शिका** आणि **नागानंद** या तिनही ग्रंथांत कर्त्याला **श्रीहर्ष** असेंच ह्मटलें आहे; पण **राजतरंगिणींत** **श्रीहर्ष** असें कोठेंच नाहीं. **हर्ष** अथवा **हर्षदेव** या नांवांनींच त्याचा उल्लेख केला आहे.

† *Harsha's* propensities, indeed, were not likely to be

नेक तंटे उपस्थित करून पुष्कळांचे प्राण हरण केले, स्त्रियांच्या संबंधानें तर त्यानें असा अनाचार केला, कीं त्याचें वर्णन देखील करवत नाहीं! यावरून त्याच्या गुणांची आणि दोषांची वजावाट करतां बाकी शून्य राहतें, असें ह्मणतां येईल. यामुळें त्याची गणना कशांतच करतां येत नाहीं. अशा प्रकारचा हा विचित्र राजा **उच्चल** नांवाच्या आपल्या शत्रूच्या भयानें पळून जाऊन एका गोसाव्याच्या मठांत छपून राहिला असतां, शत्रूच्या लोकांनीं त्याचा माग काढून तेथें त्याला घेरलें, व हा **काश्मीर**चा चक्रवर्ती आपल्या वयाच्या त्रेचाळिसाव्या वर्षी एखाद्या चोरासारखा बंडवाल्यांच्या हातून मरण पावला. एवढ्या मोठ्या सार्वभौमराजाचें मस्तक बोकडासारखें कापून तें बंडवाल्यांनीं एका काठीला अडकवून आपला यजमान **उच्चल** याच्या समोर नेलें!

असो. एकंदरींत या राजाचें चरित्र फारच मोठें आहे. त्यांत परस्परविरोधी अशा अनेक गोष्टी भरल्या आहेत,

---

regarded with a favourable eye by a Brahmanical historian, for, in order to defray the expenses into which he was led by them, he made free with the treasures of the temples, and applied their gold and silver vessels, and even the images of the gods, to his neccessities.—

H.H. Wilson's *Theatre of the Hindus*. Vol. II. Page 260

प्रोफेसर साहेबांनीं ब्राह्मण इतिहासकारांवर जो हा दोष दिला आहे, त्यास **काश्मीर**च्या इतिहासांत तर कोठें आधार नाहीं. मग याशिवाय कांहीं गुप्त प्रमाण त्यांला मिळालें असेल तर कोणास ठाऊक! एकंदरींत विलायती तर्कांचा हा एक विचित्र मासलाच आहे.

व त्यासंबंधानें पुष्कळ लिहिण्यासारखें आहे; पण या लहानशा प्रस्तावनेंत त्याचा समावेश होण्यासारखा नाहीं. आह्मी "**काश्मीरचा इतिहास**" तयार करीत आहों त्यांत ह्या सर्व गोष्टी सहजच येतील.

दुसरा **हर्ष**,* या नांवाचा राजा **कनोज**देशांत सार्वभौम झाला होता. प्रसिद्ध **कादंबरी**कार **बाणभट्ट** याणें **हर्षचरित**नांवाचें गद्यात्मक काव्य केलें आहे. त्यांत या **हर्षदेवा**चें चरित्र पुढें लिहिल्याप्रमाणें वर्णिलें आहे.—

**सरस्वती**नदीच्या किनाऱ्यावर असलेल्या **श्रीकंठ**नांवाच्या देशांत **स्थाण्वीश्वर** नांवाचें प्रसिद्ध नगर होतें; तेथें **पुष्पभूति** नांवाचा राजा होता. पुढें त्याच्या वंशांत **प्रभाकरवर्धन** नांवाचा मोठा पराक्रमी राजा झाला. त्याची **यशोमती** नामक राणी होती. त्याला **राज्यवर्धन**, **हर्ष** अथवा **हर्षदेव** नांवाचे दोघे पुत्र व **राज्यश्री** नांवाची एक कन्या, अशीं तीन अपत्यें होतीं. **प्रभाकरवर्धना**चा ज्येष्ठ पुत्र **राज्यवर्धन** याला सातवें वर्ष लागल्यावर **राज्यश्री** ही जन्मली. याच वेळीं राणी **यशोमति** हिच्या बंधूनें,

---

* याला **हर्ष** अथवा **हर्षदेव** ह्मणत होते. डा. **रामकृष्ण गोपाळ** भांडारकर ह्मणतात कीं, "**बाण**कवीनें आपल्या **हर्षचरित** नामक ग्रंथांत चरित्रनायकास **श्रीहर्ष** व **हर्षवर्धन** अशीं दोनही नांवें दिलीं आहेत." **कलकत्ता**येथें पंडित **ईश्वरचंद्र विद्यासागर** यांणीं छापविलेलें **हर्षचरित** मूळापासून शेवटपर्यंत पाहिलें तरी त्यांत **हर्षवर्धन** हें नांव उपलब्ध होत नाहीं. जेथें तेथें 'हर्ष' किंवा 'देवो हर्षः' असें ह्मटल्याचें आढळतें. व **श्रीहर्षदेव** असेंही ह्मटलें आहे. क. ए. पृ. ३७ पहा.

त्याचा **भंडी** नांवाचा एक मुलगा होता, तो आपल्या बहिणीजवळ आणून ठेवला. यावेळीं त्याचें वय आठ वर्षांचें होतें. नंतर **प्रभाकरवर्धनानें माळव्याच्या** राजाचे मुलगे **कुमारगुप्त** व **माधवगुप्त** यांला जिंकून आणून आपल्या पुत्रांच्या सेवेस लावलें. **मौखर** कुलांत उत्पन्न झालेला **कान्यकुब्ज** देशाचा राजा **अवंतिवर्मा** याचा पुत्र **ग्रहवर्मा** हा आपल्या मुलीला योग्य पति आहे असें ठरवून, **प्रभाकरवर्धनानें राज्यश्रीचा** त्याच्याशीं विवाह करून दिला; व ती आपल्या पतीबरोबर सासरीं गेली. मध्यंतरीं बरेच दिवस गेल्यावर **प्रभाकरवर्धनानें** आपला ज्येष्ठ पुत्र **राज्यवर्धन** याला **हूण**लोकांवर स्वारी करण्यास पाठविलें. **राज्यवर्धन** व **हर्ष** हे दोघे बंधु जिवलग मित्र होते ह्मणून **हर्ष**ही वडीलबंधूबरोबर गेला. **कैलास**पर्वतापर्यंत दोघांची सोबत होती; पण **राज्यवर्धन** त्या पर्वतावर गेला, तेव्हां **हर्ष** शिकारीच्या नादांत गुंतून खालींच राहिला. इतक्यांत घराकडून **प्रभाकरवर्धन** फार आजारी आहे अशा अर्थाचें पत्र घेऊन जासूद आला. तेव्हां वडील बंधु आपल्यापासून फार दूर गेला आहे असें पाहून एकटा **हर्ष**च तावडतोब बापाच्या भेटीस आला; व तेथें आल्यावर थोरल्या बंधूला लवकर बोलावण्याकरितां त्याणें जासूद पाठविला. त्याप्रमाणें **राज्यवर्धन** घाई-घाईनें राजधानीकडे परत येण्यास निघाला; पण बराच अवकाश लागल्यामुळें तो येऊन पोंचण्यापूर्वींच **प्रभाकरवर्धन** इंद्राचा पाहुणचार घेण्यास निघून गेला.

यावेळीं एकटा **हर्ष** मात्र पित्याजवळ होता. त्याणें बापाचें क्रियाकर्मांतर वगैरे यथासांग केलें. वस्तुतः या-

वेळीं त्याच्या मनांत कांहीं पाप असतें, तर तो थोरल्या बंधूला फसवून बापाचें राज्य खुशाल बळकावून बसला असता. पण त्या प्रेमळ व धर्मनिष्ठ बंधूच्या मनांत देखील ती गोष्ट आली नाहीं. तो राजगादी तशीच रिकामी ठेवून व जिकडे तिकडे सर्व बंदोबस्त करून **राज्यवर्धना**च्या येण्याची वाट पहात बसला. नंतर लौकरच तोही येऊन पोंचला. **हर्षानें** त्याला गादीचा स्वीकार करण्याविषयीं विनंति केली; पण **राज्यवर्धनानें** आपण सर्वसंग परित्याग करून जोगी होण्याचा निश्चय केला आहे, असें त्याला सांगितलें. तेव्हां **हर्षानें**ही तोच मार्ग स्वीकारण्याचा निश्चय करून, दोघेही बंधु वल्कलें धारण करून वनांत जाण्यास निघाले. इतक्यांत त्यांची बहीण **राज्यश्री** हिचा अत्यंत विश्वासू **संवादक** नांवाचा सेवक दुःखी कष्टीहोऊन तेथें प्राप्त झाला ; व त्याणें '**प्रभाकरवर्धन** परलोकवासी झाला ही संधि साधून **माळव्या**च्या राजानें **ग्रहवर्म्या**वर स्वारी करून त्याला ठार केलें; व **राज्यश्री**ला **कान्यकुब्ज** येथें कैदेंत ठेविलें असून तो तुमच्याही राज्यावर स्वारी करण्यास येत आहे' असें सांगितलें.

यावेळीं उभयतां बंधु जोगी बनण्याच्या तयारींत होते, तरी **संवादकानें** सांगितलेलें हृदयद्रावक वर्तमान ऐकून, त्याणीं तत्काल आपला बेत फिरविला. व दहा हजार घोडेस्वार बरोबर घेऊन, **राज्यवर्धन माळव्या**वर चालून गेला. यावेळीं त्याचा मामेभाऊ **भंडी** हाही त्याच्या बरोबर होता. **हर्ष** त्याच्याबरोबर न जातां आपल्या राज्याचा बंदोबस्त करून घरींच राहिला. नंतर कित्येक दिवसांनीं **राज्यवर्धना**च्या कृपेंतला **कुंतल** नांवाचा स्वार परत आला; व त्यानें **गौडदे-**

शच्या राजानें विश्वासघात करून **राज्यवर्धना**चा वध के-ल्याचें दुःखकारक वर्तमान **हर्षा**ला कळविलें. शोकाकुल झालेल्या **हर्षा**नें बंधूची उत्तरक्रिया करून शत्रूचा सूड उगवावा, ह्मणून राजधानीच्या बाहेर **सरस्वती**च्या कांठीं **कटक** येथें मुक्काम केला. तेथें त्याला **प्रागुज्योतिष** देशाचा राजा **भास्करवर्मा** याच्याकडून मित्रत्वाचा निरोप कळ-विण्याकरतां **हंसवेग** नांवाचा त्याचा जासूद येऊन भेटला. **भास्करवर्म्यां**ची विनंति मान्य करून **हर्षदेवा**नें जासुदाला परत पाठवून पुढें शत्रूवर चाल केली. इतक्यांत **माळ-व्या**च्या राजाला जिंकून व त्याच्यापासून पुष्कळ लूट घेऊन **भंडी** त्याला येऊन भेटला. त्यानें **राज्यश्री** बंदीं-तून सुटून विंध्यपर्वताच्या खोऱ्यांत गेली आहे असें सां-गितलें. तें ऐकतांच **हर्षदेवा**ला आधीं बहिणीचा शोध करायचा होता; म्हणून त्याणें **गौड**देशच्या राजाचा सूड घेण्यास **भंडी**ला पाठविला, व आपण बहिणीच्या शोधास गेला. यावेळीं **ग्रहवर्म्यां**चा बालमित्र **दिवा-करमित्र** हा त्याच्याबरोबर होता. त्याच्या साह्यानें शोध लावतां लावतां अग्नींत उडी टाकण्यास तयार झालेली **राज्यश्री** त्याला भेटली; तिला घेऊन तो परत **कटक** येथें आला. नंतर शत्रूंचा पराभव करून त्याणें बहुत वर्षें सार्वभौम पदवीचा उपभोग घेतला, असें वर्णन केलें आहे.

वर ज्यांचीं चरित्रें दिलीं आहेत, ते **काश्मीर**चा **हर्षदेव** व **कनोज**चा **हर्षवर्धन** हे दोघेही **भरतखंडां**तल्या एकेका प्रदे-शाचे सार्वभौम होते. **हर्षदेव** जसा विद्वानांचा शोकी होता, तसाच **हर्षवर्धन**ही होता. फरक इतकाच कीं **हर्षदेव** अत्यंत दुराचारी होता, व **हर्षवर्धन** विशेष सद्वर्तनी होता. तेव्हां

आतां प्रश्न म्हणून इतकाच राहिला कीं, **हर्ष** नांवाच्या वर सांगितलेल्या दोघां राजांतून **रत्नावली**, **प्रियदर्शिका** आणि **नागानंद** यांचा कर्ता कोण, याचा निर्णय केला पाहिजे.

**काश्मीरचा** राजा **हर्षदेव** हाच वरील तिन्ही ग्रंथांचा कर्ता असें प्रोफेसर **विल्सन्** साहेब म्हणतात.* व त्यावरूनच बहुतेक लोकांचा असा समज झाला आहे कीं, **रत्नावली** इत्यादिकांचा कर्ता **काश्मीरचा** राजा **हर्षदेव** हाच होय. पण ही समजूत चुकीची आहे असें सप्रमाण सिद्ध होतें. **कल्हणानें** वर्णन केलें आहे त्याप्रमाणें **काश्मीरचा हर्षदेव** हा मोठे कवि व विद्वान् यांचा आश्रयदाता होता,† असें सिद्ध होतें. **शंभु**-महाकवि इत्यादि पुष्कळ मोठमोठे काव्यकर्ते त्याच्या पदरीं होते असेंही समजतें. तेव्हां **रत्नावली** इत्यादि

* "It is stated in the prelude to be the composition of the sovereign S'ri-*Harsh Dave*. A king of this name, and a great patron of learned men, reigned over Kashmir; he was the reputed author of several works, being, however, in fact only the patron, the compositions bearing his name being written, the author of the *Kâvya-Prakâs'a* asserts, by *Dhâvaka* and other poets."

H.H. WILSON'S *Theatre of the Hindus*. Vol. II Page 259.

† याविषयीं **कल्हणकृत राजतरंगिणीच्या** सातव्या तरंगांत पुढें लिहिल्याप्रमाणें वर्णन केलें आहे—

**काश्मीरेभ्यो विनिर्यान्तं राज्ये कलशभूपतेः ।**
**विद्यापतिं यं कर्णाटश्चक्रे पर्माडिभूपतिः ॥**
**त्यागिनं हर्षदेवं स श्रुत्वा सुकविबान्धवम् ।**
**रि(बि)ल्हणो वञ्चनां मेने विभूतिं तावतीमपि ॥**

त. ७ श्लो० ९३६, ९३८.

तीन ग्रंथ त्याणें अथवा त्याच्या आश्रयास राहणाऱ्या दुसऱ्या पंडितांनीं केले असें ह्मटलें तर संभवण्यासारखें आहे; पण कित्येक प्रमाणांवरून तसें ह्मणतां येत नाहीं. कारण, **भोजराजानें** केलेल्या **सरस्वतीकण्ठाभरण** नामक साहित्यग्रंथांत **रत्नावलींतलीं** पुष्कळ उदाहरणें घेतलीं आहेत. तेव्हां अर्थात् **रत्नावली** त्यावेळीं प्रसिद्ध असली पाहिजे, व ती **भोजाच्या** पूर्वीं रचली असली पाहिजे, याविषयीं कोणी संशय घेणार नाहीं. **भोजराज** हा ख्रिस्ती सनाच्या ९९६ वर्षांपासून १०५१ वर्षेंपर्यंत **माळवा**-प्रांतांत राज्य* करीत होता; असें अर्वाचीन शोधांवरून सिद्ध झालें आहे. **राजतरंगिणीवरून** **भोजराज** आणि **हर्षदेवाचा** आजा **अनंतदेव** हे दोघे एकाकालीं† होते असें सिद्ध होतें. **अनंतदेवानें** बावन वर्षें, चार महिने, सात दिवस राज्य केलें व त्याच्यानंतर **कलशदेवानें** आठ वर्षें, एक महिना; नंतर **उत्कर्षानें** २२ दिवस राज्य केल्यावर **हर्षदेव** गादीवर बसला. अर्थात् तो **भोजाच्या** नंतर गादीवर बसला असावा यांत कांहीं संशय नाहीं. तेव्हां **रत्नावली** इत्यादि ग्रंथ त्यानें केले असें मानलें, तर **भोजराजाच्या** **सरस्वतीकण्ठाभरणांत** त्यांतील उदाहणें कशीं येतील? **हर्षदेव** हा आपल्या वयाच्या ४३

---

* डा० **रामकृष्ण गोपाळ भांडारकर** यांचें असें मत आहे.

† याविषयीं **कल्हणकृत** **राजतरंगिणींत** असा उल्लेख आहे कीं,

**"सच भोजनरेन्द्रश्च दानोत्कर्षेण विश्रुतौ।**
**सूरी तस्मिन्क्षणे तुल्यं द्वावास्तां कविबान्धवौ ॥"**

त० ७ श्लो० २५९.

ण्या वर्षीं बंडवाल्यांच्या हातून मेला,* असें वर्णन केलें आहे. तेव्हां कदाचित् गादीवर बसण्यापूर्वीं हे ग्रंथ झाले असें ह्मणावें तर त्यावेळीं त्याची तशी स्थिति नव्हती. बापाच्या इतराजीमुळें तो कैदेंत होता व त्याला कांहीं नियमित नेमणूक मात्र मिळत होती. तेव्हां त्यावेळीं त्याच्याकडून विद्वानांला आश्रय मिळण्याचा संभव नाहीं. या सर्व प्रमाणांवरून **काश्मीर**चा राजा **हर्षदेव** याचा **रत्नावली** इत्यादिकांच्या कर्तृत्वाशीं कांहीं संबंध नाहीं, हें उघड सिद्ध होतें.

नीट विचार करतां या ग्रंथांचें कर्तृत्व **कनोज**देशचा राजा **हर्षदेव** याच्याचकडे येतें. हा राजा ख्रिस्ती सनाच्या सातव्या शतकाच्या पूर्वार्धांत होता, याविषयीं कांहींच संशय नाहीं. कारण **चीन**देशांतील यात्रेकरू **हुएनत्संग** हा **भरतखंडांत बौद्ध**धर्मक्षेत्रें पाहण्यास आला होता; व तो सन ६२९ पासून ६४५ पर्यंत या देशांत फिरत होता. त्यानें आपल्या प्रवासवृत्तांत आपण या **हर्ष**राजाची भेट घेतली होती, असें वर्णन केलें आहे. याशिवाय **चालुक्य**वंशांतला राजा दुसरा सत्याश्रय **पुलकेशी** याणें **हर्ष**राजाशीं लढाई करून त्याला जिंकलें होतें;† असें **येहोळ** येथें मिळालेल्या शिलालेखांत आहे. हा लेख शालिवाहन शके ५५६ ह्म० इसवी ६३४त कोरलेला

---

* **द्वाचत्वारिंशतः साष्टमासा यस्य वयःसमाः ।**
**स शुक्लभाद्रपञ्चम्यां हतोऽब्दे सप्तसप्तते ॥**

कल्हणकृत रा० त. त ७ श्लो० १७२२.

† **"भयविगलितहर्षो येन चाकारि हर्षः ।"**

येहोळ येथील शिलालेख पहा.

आहे * यावरून **हर्षवर्धन** हा सातव्या शतकाच्या पूर्वार्धांत होता, हें सिद्ध होतें; व त्याणेंच **रत्नावली** इत्यादि ग्रंथ केले असावे असें मानणें हें विशेष प्रमाणभूत आहे. प्रोफेसर **विल्सन** व त्यांच्या उक्तीला प्रमाण धरून चालणारे इतर लोक **काश्मीर**च्या **हर्षदेवा**ला **रत्नावली**चा कर्ता ह्मणतात हीं त्यांची अगदीं चूक आहे, व ती वर जीं प्रमाणें दिलीं आहेत त्यांवरून उघड होते.

याशिवाय दुसरें एक सबळ प्रमाण आढळतें. तें असें, कीं प्रसिद्ध महाकवि **श्रीदामोदरगुप्त** याणें **कुट्टिनीमत** नांवाचा जो ग्रंथ केला आहे, त्याच्या ८९८व्या आर्येपासून ९२४व्या आर्येपर्यंत सुमारें ६६ आर्यांत **रत्नावली**नाटिकेंतील संविधानकाचा संग्रह केला आहे, व ठिकठिकाणीं त्यांत तिच्या नांवाचा उल्लेखही केला आहे. त्यावरून **दामोदरगुप्ता**च्या पूर्वीं ही नाटिका प्रसिद्ध होती; असें मानण्यास दुसऱ्या प्रमाणांची अपेक्षा नाहीं. हा **दामोदरगुप्त**कवि **काश्मीर**देशाचा राजा **जयापीड** याचा दिवाण होता.† हा **जयापीड**राजा ख्रिस्ती सनाच्या आठव्या शतकांत **काश्मीर**चें राज्य करीत होता, व तो **हर्षदेवा**च्या पूर्वींचा ३६ वा

---

* पंचाशत्सु कलौकाले षट्सु पञ्चशतेषु च ।
समासु समतीतासु शकानामपि भूभुजाम् ॥
निर्मापितं मतिमता रविकीर्तिनेदं ।

येहोळ येथील शिलालेख पहा.

† 'स दामोदरगुप्ताख्यं कुट्टनीमतकारिणम् ।
कविं कविं बलिरिव धुर्यं धीसचिवं व्यधात् '॥

कल्हणकृत राजतरंगिणी त० ४ श्लो० ४९६

राजा होता. त्याणें सन ७५५ पासून ७८६ पर्यंत ह्मणजे सुमारें ३१ वर्षे राज्य केलें, असें **राजतरंगिणी**वरून दिसून येतें. तेव्हां **काश्मीर**च्या **हर्षदेवानें रत्नावली** केली असें मानलें तर तिचा उल्लेख **कुट्टिनीमत**नामक ग्रंथांत कसा येईल! यावरून **काश्मीर**चा **श्रीहर्ष** याचा या ग्रंथांशीं कांहीं संबंध नाहीं हें उघड सिद्ध होतें.

आतां या **प्रियदर्शिके**विषयीं थोडासा विचार केला पाहिजे. हिचा कर्ता व **रत्नावली**चा कर्ता या दोघांचें नांव **श्रीहर्ष** असेंच आहे; पण प्राचीन साहित्यग्रंथांत या नाटिकेचा कोठेंच उल्लेख केल्याचें दिसून येत नाहीं.* **सरस्वतीकण्ठाभरण**, **काव्यप्रकाश**, **औचित्यविचारचर्चा**, **सुवृत्ततिलक** इत्यादि अलंकाराचे किंवा छंदाचे पाहिजे ते ग्रंथ घेतले तरी जेथें तेथें **श्रीहर्षा**च्या नांवानें जे जे श्लोक घेतले आहेत, ते **रत्नावलीं**तलेच आहेत. या **प्रियदर्शिके**चें कोणत्याहि ग्रंथांत नांवदेखील उपलब्ध होत नाहीं हा मोठा चमत्कार आहे. यावरून अनेक प्रकारचीं अनुमानें काढतां येतात; पण ज्यांवरून कांहीं निश्चय होत नाहीं, तसलीं अनुमानें येथें दाखल करण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**रत्नावली**, **प्रियदर्शिका** आणि **नागानंद** या तीनही ग्रंथांत कर्त्याच्या नांवाचा **श्रीहर्ष** व **श्रीहर्षदेव** असा उल्लेख आहे. **राजतरंगिणींत** '**श्रीहर्ष**' असें कोठेंच आलेलें नाहीं. प्रसिद्ध **नैषध** काव्याचा कर्ताही **श्रीहर्ष** या नांवानें

---

* प्रो. **विल्सन** यांच्या हिंदुथिएटर नांवाच्या ग्रंथांत देखील प्रियदर्शिकेचें नांव आढळत नाहीं.

प्रसिद्ध आहे; पण तो राजा नव्हता. **रत्नावली** इत्यादि-कांच्या प्रस्तावनेंत "राज्ञःश्रीहर्षदेवस्य" असें ह्मटलें आहे. तेव्हां त्यांचा कर्ता राजा असलाच पाहिजे. यावरून पाहतां **नैषध**कार **श्रीहर्ष** याचा या ग्रंथांशीं कांहीं संबंध नाहीं.

वर केलेल्या विवेचनावरून **कनोज**देशाचा राजा **हर्षदेव** हाच **रत्नावली** इत्यादि तीन ग्रंथांचा कर्ता असें सिद्ध झालें. पण ते स्वतः त्याणेंच केले किंवा त्याच्या आश्रयास असलेल्या दुसऱ्या कोणी कवीनें केले या गोष्टीची फोड झाली पाहिजे. **श्रीहर्षा**च्या आश्रित कवीनें-च हे ग्रंथ रचले असून त्याणें ते आपल्या यजमानाच्या नांवानें प्रसिद्ध केले, अशी सार्वत्रिक समजूत आहे. व हिला आधार कायतो "श्रीहर्षादेर्धावकादीनामिव धनम्" ह्या **काव्यप्रकाशां**तील उक्तीचाच आहे. याशिवाय दुसरें कांहीं प्रमाण असल्याचें दिसत नाहीं. **श्रीहर्ष** हा राजा होता. तेव्हां त्याला ग्रंथ करण्याइतकी विद्वत्ता कोठून प्राप्त होणार! अशा समजुतीनें कोणी वरील कंडी पिकविली असावी; असें ह्मणावें तर **धारे**चा राजा **भोजदेव** हाही एका मोठ्या प्रदेशाचा राजाच होता. व त्याच्या नांवानें पुष्कळ ग्रंथ प्रसिद्ध आहेत; पण, त्याबद्दल तशी कांहीं प्रसिद्धि नाहीं. ते ग्रंथ स्वतः त्या राजानेंच केले असें लोक समजतात. असें असून **श्रीहर्षा**-च्या संबंधानेंच जेव्हां अशी लोक प्रसिद्धि आहे, तेव्हां तिला कांहीं तरी आधार असेल असें कोणी ह्मणेल; पण वस्तुतः ती समजूत अगदीं निराधार असावी, असें दिसतें. कारण **काव्यप्रकाशां**तलें जें वाक्य आम्हीं वर

दिलें आहे, त्याचा—"**श्रीहर्षा**दिकांपासून ***धावकादिकांला** धन मिळालें " इतकाच अर्थ होतो. व हेंच वाक्य वरील समजुतीला मुख्य आधार आहे. पण यावरून **धावकानें रत्नावली** इत्यादि काव्यें रचून **श्रीहर्षा**च्या नांवानें प्रसिद्ध करून त्यापासून द्रव्य मिळविलें असा अर्थ कां घ्यावा? हें कांहींच समजत नाहीं. वरील वाक्याचा—" **धावकानें** काव्यें रचलीं, त्यावरून **श्रीहर्षा** राजा प्रसन्न झाला, व त्याणें पुष्कळ द्रव्य दिलें" असा अर्थ कां घेऊं नये? वस्तुतः हाच अर्थ सरळ आहे, असें कोणींही मार्मिक कबूल करील. यावरून पाहतां

---

* **धावका**चें नांव तरी **काव्यप्रकाशा**च्या सर्व पुस्तकांत आढळत नाहीं. **काश्मिरांत** जीं **काव्यप्रकाशाचीं** पुस्तकें आढळतात, त्यांत **धावका**च्या बद्दल "श्रीहर्षादेर्बाणादीनामिवधनम्" असा पाठ आढळतो; व **काश्मिरांत**ले पंडित धावक या नांवांचा कवि मुळींच नव्हता, असें ह्मणतात. त्यांच्या मतें **रत्नावली** इत्यादिकांचा कर्ता प्रसिद्ध **बाणभट्ट** हाच होय. **काव्यप्रकाश** हा ग्रंथ **काश्मिरांत** झाला तेव्हां **काश्मिर**देशांतल्या पुस्तकांच पाठ इतर देशांतल्या पुस्तकांपेक्षां विशेष प्रमाण मानला पाहिजे असें **पंडित दुर्गाप्रसादजी** ह्मणतात. ( लघु काव्यमाला गुच्छक १ पृष्ठ ११७ यावरील तिसरी टीप पहा ) व तें सयुक्त दिसतें. **काश्मीर**काचा पाठ घेतला तर **बाणभट्ट** हा मोठा कवि असल्यामुळें त्याच्या त्या गुणाला मान देऊनच **श्रीहर्ष** राजानें त्याला आपल्या पदरीं ठेविला होता. व त्याच्यापासून त्याला पुष्कळ द्रव्य मिळालें, हें प्रसिद्धच आहे. **बाणभट्टानें कादंबरी**सारखा अत्युत्तम ग्रंथ आपल्या यजमानाच्या नांवानें प्रसिद्ध न करतां **रत्नावली**सारखा लहानसा ग्रंथ त्याच्या नांवानें प्रसिद्ध केला असें ह्मणणें हें किती सयुक्त दिसेल, याचा वाचकानींच विचार करावा.

स्वतः **श्रीहर्ष** राजानें **रत्नावली** इत्यादि ग्रंथ रचले नाहींत व ते **धावकानें** रचून आपल्या यजमानाच्या नांवानें प्रसिद्ध केले अशी जी समजूत आहे, ती अगदीं निराधार असून चुकीची असावी असें वाटतें. **धावकाचें** नांव काय तें कित्येक ठिकाणच्या **काव्यप्रकाशाच्या** पुस्तकांत मात्र मिळतें. त्याणें केलेला एकही ग्रंथ अद्याप उपलब्ध झाला नाहीं, व त्याचें नांव अन्य ग्रंथांत कोठें मिळत नाहीं; तेव्हां **काश्मीरांतील** पंडितांच्या मताप्रमाणें त्याचें आस्तित्वच मानण्यास कांहीं आधार नाहीं.

येथवर ग्रंथकर्त्याच्या संबंधानें जें कांहीं विवेचन करायचें होतें तें केलें. संविधानकाच्या संबंधानें विशेष कांहीं लिहावयास नको. मुळांत एक दोन ठिकाणीं कांहीं प्रमाद दिसले तेथें थोडासा फेरफार* केला आहे. आणखीं विशेष ह्मणण्यासारखें कांहीं नाहीं.

**मुंबई,**
गिरगांव पोर्चुगीजचर्चलाईन,
घर नं० २०,
ता० २१ माहे डिसेंबर १८८९.

**वा० झा० इ०**

---

* पृष्ठ १० ओळ २६ येथें मूळांत **प्रद्योततनया** असें ह्मटलें आहे; पण **वासवदत्ता** ही **प्रद्योताची** मुलगी नव्हती, व **वत्सराज** **प्रद्योताच्या** येथें प्रतिबंधांतही राहिला नव्हता. **प्रद्योताची** कन्या **पद्मावति** हिच्याशीं राजाचा विवाह झाला होता; पण त्यांत बंदिशाळेचा कांहीं संबंध नव्हता. याविषयीं आम्हीं केलेल्या **बृहत्कथासागर** भाग पहिला व दुसरा पहावा.

# ललितवत्सराज.

## ( उत्तरार्ध. )

धूमव्याकुलदृष्टिरिन्दुकिरणैराल्हादिताक्षीपुनः ।
पश्यन्ती वरमुत्सुका नतमुखी भूयो न्हियां त्र्यक्षणः ॥
सेर्ष्या पादनखेन्दुदर्पणगते गङ्गां दधाने हरे ।
स्पर्शादुत्पुलका करग्रहविधौ गौरी शिवायास्तु वः ॥ १ ॥

पूर्वार्धाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें राणी वासवदत्ता संतुष्ट होऊन तिनें आपली मावसबहीण रत्नावली ही आपण होऊन वत्सराजाला दिली, व आतां त्याचें मन संतुष्ट होऊन तो तेवढ्यावरच तृप्त राहील, अशी तिला मोठी आशा होती; पण ती पूर्ण होण्याचा योग आला नाहीं. विषयी पुरुषांला एकाच स्त्रीचें सेवन करीत राहणें आवडत नाहीं. त्यांना प्रत्येक दिवशीं नव्या नव्या स्त्रियांची अपेक्षा होते. त्याप्रमाणें वत्सराजाला दुसरी एक अति उत्तम स्त्री प्राप्त होण्याचा योग आला, व तो त्या रंगेल्या राजानें फुकट जाऊं दिला नाहीं.

अंगदेशाचा* राजा दृढवर्मा याचें आणि राणी वासवदत्ता हिचें नातें होतें. वासवदत्तेची आई अंगारवती

* अंग या नांवाचा देश पूर्वकाळीं प्रसिद्ध होता. सांप्रत त्याचें हें नांव प्रचारांत नाहीं. हा देश ह्मणजे बंगाल इलाख्यांतील भागलपूर नांवाच्या शहराच्या पश्चिमेस शरयू आणि भागीरथी या दोन नद्यांच्या मधला प्रदेश. हाच अंगदेश होय असें नवीन शोधकांचें मत आहे.

हिची सख्खी बहीण **दृढवर्म्याला** दिली होती, तेव्हां **दृढवर्मा वासवदत्तेचा** मावसा होत होता. त्याला **प्रियदर्शिका** नांवाची एक अत्यंत रूपवती कन्या झाली होती. तिचें, विवाह करण्याला योग्य होईल इतकें वय होण्यापूर्वींच **दृढवर्म्यानें** तिच्या लग्नाची तयारी केली. **दृढवर्म्याच्या** मनांत ती कन्या **वत्सराजाला** द्यावी असें होतें, व त्याप्रमाणें त्यानें दृढ निश्चयही केला होता.

हा निश्चय झाला त्यावेळीं **वत्सराजाचा वासवदत्तेशीं** विवाह होऊन वर सांगितलेलें नातें जडलेलें नव्हतें. **प्रियदर्शिका वत्सराजाला** द्यायची असा **दृढवर्म्याचा** संकल्प मात्र झाला होता. इतक्यांत ***कलिंग**देशचा राजा **द्युमत्सेन** याच्या जवळ **प्रियदर्शिके**च्या अप्रतिम लावण्याची कोणीं अतिशय तारीफ केल्यामुळें ती—आपली राणी व्हावी असा त्याचा हेतु होता, व त्याप्रमाणें त्यानें **दृढवर्म्या**जवळ तिची मागणी देखील केली. पण **दृढवर्म्याचा**, **प्रियदर्शिका वत्सराजालाच** देण्याचा, पूर्वीं निश्चय झाला असल्यामुळें, त्यानें **कलिंग**राजाच्या मागणीला अनुमोदन दिलें नाहीं.

**दृढवर्म्यानें** पूर्वींच वाग्निश्चय केला असल्यामुळें **क-**

---

* कलिंग या नांवाचा देश हिंदुस्थानाच्या आग्नेयी दिशेस पूर्व किनाऱ्यावर आहे. याची हद्द ओढिसाप्रांतापासून चोल देशापर्यंत आहे, असें अर्वाचीन शोधक ह्मणतात. सांप्रत कलिंग हें नांव प्रचारांत नाहीं. या देशाची मुख्य राजधानी राजमहेंद्री नांवाचें जें प्रसिद्ध शहर आहे त्यांत होती असें सांगतात. याला पूर्वकाळीं दंतपूर अथवा राजदंतपूर असें ह्मणत असत व त्यानंतर राजमहेंद्रपूर ह्मणत व सांप्रत तर राजमहेंद्री ह्मणतात. हें शहर गंजम शहराच्या नैर्ऋत्यादिशेस सुमारें २५० मैल अंतरावर आहे.

**लिंगराजाची** मागणी नाकारली, यांत त्यानें त्याचा मोठासा अपराध केला होता असें नाहीं, तरी अभिमानी **कलिंग-राजाला** ती गोष्ट सहन झाली नाहीं. त्याच्या जवळ बरीच मोठी फौज होती व **दृढवर्म्यापेक्षां** तो मोठा शूरही होता. ह्मणून स्नेहपूर्वक **दृढवर्मा** आपली मागणी मान्य करीत नाहीं तर त्याच्यावर स्वारी करून बलात्कारानें **प्रियदर्शिकेचें** हरण करावें, असा निश्चय करून त्याप्रमाणें त्यानें कडेकोट तयारी केली.

**दृढवर्म्यानें प्रियदर्शिका** देण्याचा आपला हेतु आहे ही गोष्ट **वत्सराजाला** कळविली असून त्यानें ती मान्य केली होती. **दृढवर्मा** स्वतः मोठा बलाढ्य नव्हता, तरी **वत्सराज** मोठा शूर व बलाढ्य होता. व **प्रियदर्शिकेच्या** संबंधानें लवकरच उभयतांचें नातें जुळणार असल्यामुळें, आपण **दृढवर्म्यावर** स्वारी केली, तर कदाचित् **वत्सराज** त्याच्या पक्षानें लढायला येईल, व **वत्सराजापुढें** आपलें कांहीं चालणार नाहीं, या गोष्टीची **कलिंगराजाला** भीति होती. म्हणून **दृढवर्म्याचा** सूड घ्यावा असें त्याच्या मनांत होतें तरी तो एकदम त्याच्यावर स्वारी करण्यास धजला नाहीं. पण लवकरच त्याला उत्तम प्रकारची संधि मिळाली.

**वासवदत्तेचा** पिता **चंडमहासेन** यानें युक्तिप्रयुक्तीनें **वत्सराजाला** पकडून कैदेंत ठेवलें.* त्याच्या मनांत **वासवदत्ता** त्याला द्यावयाची होती, पण ती विशेष आर्जवें न करतां मोठ्या थाट्यानें द्यावी, अथवा त्यानें होऊन पायां पडून

* ही कथा आह्मीं केलेल्या "बृहत्कथासागर" नांवाच्या मराठी पुस्तकाच्या पहिल्या भागांत सविस्तर वर्णन केली आहे.

मागावी असें त्याच्या मनांत होतें. दृढवर्म्याचा साह्यकर्ता वत्सराज याप्रमाणें कैदेंत पडला, ही गोष्ट कलिंगाच्या पथ्यावर पडली. त्यानें दृढवर्म्याचा समाचार घेण्यास हीच उत्तम संधि आहे असें पाहून त्याच्यावर एकदम स्वारी केली.

कलिंगराज आपल्याशीं लढायला येत आहे, हें समजून दृढवर्म्यानेंही मोठ्या आवेशानें त्याला लढाई दिली. उभयतांचें बरेच दिवस जंगी युद्ध झालें; पण त्यांत शेवटीं दृढवर्म्याचा सर्वस्वीं पराभव झाला. त्याच्याकडचे मोठे मोठे वीर समरांगणांत पडले, व शेवटीं कलिंगराजानें त्याला अगदीं जर्जर करून कैद केलें. त्यामुळें बाकी राहिलेली फौज सैरावैरा धांवत सुटली.

हा लढाईचा भयंकर प्रसंग सुरू होऊन त्यांत आपल्या पक्षाचा मोड होत चालला आहे, तेव्हां कलिंगराजा बलात्कारानें प्रियदर्शिकेचें हरण करील असें समजून, दृढवर्म्याचा विश्वासू चोपदार विनयवसु यानें, प्रियदर्शिका कलिंगराजाच्या हातीं न लागावी म्हणून, त्या गडबडींत मोठ्या युक्तीनें तिला पळवून नेली. व तें वर्तमान कलिंगराजाला मुळींच समजलें नाहीं. लढाईचा शेवट होऊन दृढवर्म्याला कैद केल्यावर त्यानें प्रियदर्शिकेचा पुष्कळ शोध केला; पण ती त्याला कोठें मिळाली नाहीं. या लढाईचें मुख्य कारण काय तें प्रियदर्शिकाच होती. ती मिळाली असती तर कलिंगराजानें दृढवर्म्याला सोडलें असतें; पण तिची प्राप्ति न झाल्यामुळें अधिक चवताळलेला कलिंगराज दृढवर्म्याला कैद करून आपली राजधानी दंतपूर येथें परत निघून गेला.

ह्मातार्‍या चोपदारानें प्रियदर्शिकेला पळविलें; पण तिला कोठें ठेवावी याचा त्याला मोठा विचार पडला होता. वत्सराजाकडे न्यावी तर तो कैदेंत पडला आहे. तेंव्हां ह्या मुलीला सुरक्षित स्थळ कसें मिळेल, याचा त्याला विचार पडला होता. विंध्यपर्वताच्या* खोर्‍यांत विंध्यकेतु नांवाचा एक भिल्लांचा राजा रहात असून दृढवर्म्याशीं त्याची विशेष मैत्री होती, हें त्या चोपदाराच्या लक्ष्यांत आलें. व त्याच्या घरीं प्रियदर्शिकेला सुरक्षित ठेवावी असा विचार करून, तो विंध्यकेतूकडे गेला आणि त्याला त्यानें सर्व हकीकत कळविली.

विंध्यकेतु बराच मोठा प्रबळ असून त्या पर्वताच्या खोर्‍यांत त्याची विशेष सत्ता चालत होती. आपला मित्र दृढवर्मा याचा अशा रितीनें मोड झाला, व तो मोठ्या संकटांत पडला आहे, हें ऐकून त्याला फार वाईट वाटलें. तरी मित्राच्या कार्याकरितां कलिंगावर स्वारी करून त्याचा पराभव करण्याइतकी त्याची शक्ति नव्हती, ह्मणून तो उगीच राहिला. तशा लढाईच्या गर्दींतून आलेली व आईबाप जवळ नसल्यामुळें अत्यंत दीन झालेली, अशी राजकन्या प्रियदर्शिका

---

* भरतखंडाच्या मध्यभागीं विंध्यनांवाचा लांबच लांब एक मोठा पर्वत आहे. सांप्रत ह्याला सातपुडा ह्मणतात. याची रुंदी सुमारें शंभर मैल असून लांबी बरीच मोठी आहे. वायव्येकडून दक्षिणेकडे आलेले आर्यलोक पुष्कळ वर्षेंपर्यंत विंध्यपर्वताच्या उत्तरेसच रहात असत व नंतर हळुहळू दक्षिणेकडे ते वसाहत करूं लागले. विंध्यपर्वताच्या दर्‍या खोर्‍यांत बहुतकरून भिल्ल, कोळी वगैरे लोक रहात होते, व सांप्रतही त्यांची तेथें वसती आहे.

हिला त्यानें मोठ्या प्रेमानें आपल्या येथें ठेवून घेतलें, व तिला दुःख होऊं नये ह्मणून तो फार जपत होता.

इतक्यांत **वत्सराज वासवदत्तेला** घेऊन **चंडमहासेनाच्या** बंदिशाळेंतून पळून गेला. **यौगंधरायण** व **रुमण्वान्** हे त्याचे दोन मुख्य प्रधान व सेनापति यांनीं त्याला उत्तमप्रकारचें साह्य करून त्या कामांत यशस्वी केलें. पण **विंध्यकेतूनें वत्सराजाला** तो **कौशांबीकडे** जात असतां अटकाव करण्याचा प्रयत्न केला होता. तो आपल्याला **चंडमहासेनाचा** मित्र ह्मणवीत होता, ह्मणून त्याच्या तर्फेनें **वत्सराजाला** हरकत करण्यास प्रवृत्त झाला.

**यौगंधरायण** इत्यादि मसलती लोकांनीं याचा बंदोबस्त आधींच करून ठेवला होता, यामुळें **विंध्यकेतूला** त्या कामांत यश आलें नाहीं. व **चंडमहासेन** आणि **वत्सराज** यांचें परस्पर सख्य होऊन **विंध्यकेतु** मात्र **वत्सराजाचा** पुरता वैरी बनला !

**वत्सराज कौशांबीनगरींत** येऊन पोंचल्यावर, कांहीं दिवसांनीं त्यानें **विजयसेन** नांवाच्या आपल्या एका सरदाराला—त्याच्या बरोबर मोठी फौज देऊन, **विंध्यकेतूचा** सूड घेण्यास पाठविलें. ह्मातारा चोपदार व **प्रियदर्शिका** हीं **विंध्यकेतूच्या** घरीं दिवस काढीत होतीं अशा संधींत **वत्सराजानें** पाठविलेला **विजयसेन** कडेकोट तयारीनें **विंध्यकेतूवर** चाल करून आला.

ज्या दिवशीं **विजयसेनानें विंध्यकेतूवर** हल्ला केला, त्या दिवशींच कांहीं पर्वणी होती; ह्मणून तेथून जवळच **अगस्त्यतीर्थ** नांवाचें एक पवित्र तीर्थ होतें, तेथें **दृढवर्म्याचा** चोपदार **विनयवसु** स्नान करावयास गेला होता. तो

परत येण्यापूर्वींच विंध्यकेतूचा फडशा पडला. **विजयसेनानें** त्याच्यावर एकाएकीं हल्ला करून, चारसहा घटकांच्या अवकाशांत त्याच्या लोकांची कत्तल केली व शेवटीं **विंध्यकेतूला** ठार मारलें.

बिचाऱ्या अनाथ झालेल्या **प्रियदर्शिकेला** सोबत देणारा व संभाळणारा म्हातारा चोपदार यावेळीं जवळ नसून, ज्याच्या आश्रयानें ती राहिली होती तो **विंध्यकेतुही** मारला गेला; यामुळें ती तेथून थोड्याशा अंतरावर जाऊन तेथें एका झाडाखालीं रडत बसली होती. इतक्यात विजयी झालेला **विजयसेन विंध्यकेतूच्या** घरादाराचा सत्यानास करून परत आपल्या यजमानाकडे जाण्यास निघाला असतां **प्रियदर्शिका** त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां त्या सुंदर कन्येला पाहून—ही आपल्या राजाला नजर करावी, या विचारानें म्हणा, किंवा तिची दया आली म्हणून म्हणा, **विजयसेनानें** त्या मुलीला आपल्या बरोबर घेऊन **कौशांबीस** नेली.

याप्रमाणें इकडची वारासार झाल्यावर, म्हातारा चोपदार आपला नेमधर्म आटपून **अगस्त्यतीर्थावरून** परत **विंध्यकेतूच्या** ठिकाणाकडे आला; पण तेथें कशास कांहीं मेळ दिसेना. पूर्वींच्या खाणाखुणा अगदीं नाहींशा झाल्या होत्या. **विंध्यकेतु** हा राजा होता, तरी तो **भिल्लांचाच** राजा असून त्यांच्याच जातीचा होता. **भिल्ललोकांसारखे** जंगली लोक बहुतकरून कसल्या तरी भिकार झोंपड्यांत रहावयाचे. त्यांना घरेंदारें वगैरे कोठून असणार! **विंध्यकेतु** त्यांच्यांत प्रमुख होता, म्हणून याचें झोंपडें इतर **भिल्लांहून** अंमळ मोठें असेल; पण शत्रूंनीं तें जाळून

नाहींसें करून टाकलें होतें यामुळें विनयवसूला तेथें कांहींच दिसलें नाहीं.

चोपदार घाबरा होऊन त्यानें प्रियदर्शिकेचा चहूंकडे शोध केला; पण कोठेंच कांहीं पत्ता लागला नाहीं. त्या तसल्या जंगलांत पत्ता लागण्याचा मुळीं संभवच नव्हता. विंध्यकेतूवर कोणीं स्वारी केली, व त्याची काय वाट झाली हें देखील त्याला कळलें नाहीं, यामुळें तो मोठ्या गोंधळांत पडला. एकंदरींत, कोणी तरी शत्रूनें विंध्य-केतूवर हल्ला करून त्याचा नाश केला असावा, असें तो अनुमानावरून समजला. तथापि प्रियदर्शिकेची काय वाट झाली हें त्याच्या लक्षांत आलें नाहीं. चहूंकडे शोध केला तरी ती कोठेंच मिळाली नाहीं. तेव्हां तिला शत्रूंनीं नेलें, किंवा वाघ, सिंह इत्यादि क्रूर जनावरांनीं खाल्लें, अथवा तिनें आत्मघात केला किंवा काय झालें, याविषयीं म्हातारा अनेक कल्पना करीत बसला.

तो चहूंकडून दुःखानें पोळला असून त्याचें शरीर-ही कृश झालें होतें, यामुळें त्याच्यानें एक पाऊल देखील पुढें टाकवेनासें झालें. तो तेथच्याच एका झाडाखालीं बसून, आतां पुढें काय करावें ? याचा विचार करूं लागला.

चोपदार, लढाईचा शेवट होण्यापूर्वींच, प्रियदर्शि-केला घेऊन तेथून पळून गेला होता, हें वर सांगितलेंच आहे. यामुळें अखेर काय झालें तें त्याच्या पाह-ण्यांत आलें नव्हतें, तरी तो अशक्त असून दूरदूरच्या मजला मारण्यास असमर्थ असल्यामुळें शत्रूच्या भयानें लपत लपत हळुहळू चालला होता. तेव्हां, आसपा-

सच्या प्रदेशांतील लोकांकडून दृढवर्म्याचा शेवटीं परिणाम काय झाला तें त्याला कळलें नव्हतें. तो वरचेवर आपल्या राजाची बातमी काढीतच होता. व **अगस्त्यतीर्थांवर** चहूंकडची यात्रा जमली होती तेथें सहज लोकवार्तेवरून **कलिंगानें दृढवर्म्याला** कैद केल्याचें वर्तमान त्याच्या समजण्यांत आलें होतें. यामुळें आधींच तो आपल्या धन्याच्या पराभवाबद्दल अतिशय दुःखी होता, व त्यांत राजकन्येचा नाश झाला तेव्हां त्याच्या मनाची स्थिति कशी झाली असेल याचें काय वर्णन करावें.

तो आपल्याशींच ह्मणाला, हाय हाय! माझ्यावर एकापेक्षां एक असह्य दुःखाचे प्रसंग आणखी किती येणार आहेत कोणास ठाऊक! आमचे महाराज (**दृढवर्मा**) विपत्तींत पडले. मला आपल्या आप्त, इष्ट, मित्रांचा वियोग होऊन दुःख झालें. स्वदेश सोडावा लागला, आणि त्यांतून अशा ह्मातारपणीं शक्ति नसतांही प्रवास करावा लागला, हीं एकापेक्षां एक किती तरी असह्य दुःखें आहेत! मी फार वर्षें वांचलों त्याचें हें कडू फळ मला भोगावें लागत आहे!

झालेल्या प्रकाराबद्दल विस्मित होऊन म्हणाला, हा असा प्रसंग आह्मांवर कां आला? आमचे महाराज म्हणजे कांहीं सामान्य वीर नव्हत. **रघु**, **दिलीप**, इत्यादिक मोठ्या पराक्रमी राजांसारखे समर्थ असून, आपण मागितली असतांही **प्रियदर्शिका** आपल्याला न देतां **वत्सराजाला** देऊं केली, याबद्दल रागावलेल्या त्या दुष्ट **कलिंगराजानें**—**वत्सराज** प्रतिबंधांत पडला आहे व त्याची आतां तेथून सुटका होणार नाहीं, असें समजून

त्यांच्यावर स्वारी केली; पण त्या युद्धांत आमच्या महाराजांचा सर्वस्वी मोड होऊन, **कलिंगानें** त्यांला कैद करून नेलें. हें जें वर्तमान आपण ऐकिलें, तें तसें होण्याचा संभव आहे, तरी देखील मला तें खरें वाटत नाहीं. कारण आमच्या महाराजांचा असा परिणाम होईल ही **गोष्ट** मला मुळींच शक्य दिसत नाहीं. तथापि लोकवार्ताही खोटी ह्मणवत नाहीं. पण हें दैव आमच्यावरच कां इतकें निर्दय झालें आहे हेंही समजत नाहीं!

तशा त्या लढाईच्या गर्दींत कदाचित् ती राजकन्या **प्रियदर्शिका कलिंगाच्या** हातीं लागेल म्हणून मीं तिला तेथून पळवून आणली. कारण, महाराज **दृढवर्म्यां**-चा, ती कन्या **वत्सराजा**ला देण्याचा जो हेतु होता, तो कोणत्या तरी रीतीनें पूर्ण करावा, म्हणून मीं तिला हा **विंध्यकेतु** महाराजांचा मित्र आहे म्हणून, याच्या येथें आणून ठेवली. आणि मला काय दुर्बुद्धि झाली कोणास ठाऊक! मी त्या **अगस्त्यतीर्था**वर स्नानास गेलों. तितक्यांत हा सर्व अनर्थ घडला. **विंध्यकेतूला** मारून त्याच्या सर्व सैन्याची कत्तल केल्यावर, ती बिचारी अनाथ मुलगी काय त्या शत्रूंनीं नेली किंवा त्यांनीं तिला जाळली, किंवा काय केलें असेल तें कोणास ठाऊक! एकंदरींत तिचें काय झालें तें समजण्याचा कांहींच मार्ग दिसत नाहीं. व कोठें जावें व काय करावें तें सुचत नाहीं.

कांहीं वेळ विचार करून म्हणाला, हो. मला आतांच **अगस्त्यतीर्था**वर स्नान करायला आलेल्या एका गृहस्थानें सांगितलें आहे कीं, **वत्सराज चंडमहासेनाच्या**

येथें कैदेंत होता, तेथें त्यानें त्याची मुलगी **वासवदत्ता** हिला अनुकूल करून, तिला पळवून घेऊन, तो परत **कौशांबीनगरींत** सुखरूप येऊन पोहोंचला. तेव्हां हें एक बरें झालें. आतां आपण त्या राजाकडेसच जाऊं.

सुस्कारा सोडून व आपल्या अवस्थेकडे पाहून पुनः म्हणाला, पण ती राजकन्या **प्रियदर्शिका** हिच्यावांचून मी तेथें गेलों, आणि त्यांनीं विचारलें, तर काय सांगावें? काल मला **विंध्यकेतूनें** सांगितलें होतें कीं, तूं कांहीं काळजी करूं नकोस. तुझे महाराज अद्याप जिवंत आहेत. त्यांच्या सर्वांगाला मोठ्या जखमा लागल्यामुळें त्यांचें शरीर अस्वस्थ झालें आहे, व **कलिंग**राजानें त्यांना प्रतिबंधांत ठेविलें आहे. तेव्हां आतां **वत्सराजा**कडे न जातां, महाराज कैदेंत आहेत तिकडेच जावें. माझे तरी आतां किती दिवस राहिले आहेत ? काय थोडेंबहुत आयुष्य असेल तें त्यांच्याच पायांच्या सेवेंत घालवून सफल करावें म्हणजे झालें !

या वेळीं सूर्य अगदीं मध्यावर आला होता. त्याच्याकडे पाहून म्हणाला, ह्या शरदृतूंतले सूर्यकिरण फारच प्रखर आहेत. कारण अनेक दुःखरूपी अग्नीनें माझें सर्वांग करपलें असतांही, याचें ऊन मला प्रखर भासतें. मला हा सूर्य या वेळीं **वत्सराजा**सारखा वाटतो. कारण हा मेघांच्या बंधनांतून मुक्त झाला आहे, व तोही **चंडमहासेना**च्या बंधनांतून मुक्त झाला आहे. यानें कन्याराशीचा स्वीकार केला आहे. त्यानें **चंडमहासेना**ची कन्या **वासवदत्ता** हिचा स्वीकार केला आहे. यामुळें हा आतां तुलाराशींत प्रवेश करणार, व तोही

परम तुला, अर्थात्, आपल्या भाग्याची परमावधि हिला प्राप्त होणार. हा तुळारूपी स्वस्थानांत आहे, व तोही आपलें स्थान **कौशांबी** हींत प्राप्त झाला आहे. तात्पर्य, ह्या उभयतांचें अगदीं सादृश्य असून जसा **वत्सराज** शत्रूंला संताप देत आहे तसा हा सूर्यही तपत आहे.

असें बोलून तेथें अम्मळ विश्रांती घेऊन चोपदार, हळुहळू आपला राजा **दृढवर्मा**, याच्या जवळ जाण्याकरितां **कलिंग** देशाकडे निघाला. तो वयानें अतिशय वृद्ध होता, व एकावर एक अनेक दुःखाचे प्रसंग आल्यामुळें त्याचें शरीर फारच क्षीण झालें होतें. तशा स्थितींत हळूहळू चालला होता. तो कित्येक महिन्यांनीं **दृढवर्म्या**जवळ जाऊन पोहोंचला.

इकडे **वत्सराज वासवदत्तेचें** हरण करून **कौशांबी**नगरींत आला, हें वर सांगितलेंच आहे. राजानें आपल्या राजधानींत येतांच सर्व बंदोबस्त नीट करून राज्यकारभाराचा भार प्रधानांवर सोंपवून तो खुशाल चैनींत आपला वेळ घालवीत असे. आपण संकटांत पडलों ही संधि साधून **कलिंग**राजानें **दृढवर्म्यां**वर स्वारी करून त्याला कैद केलें ही गोष्ट **वत्सराजा**च्या कानावर आली होती. केवळ आपल्या निमित्तानेंच **दृढवर्म्यां**वर हा संकटाचा प्रसंग आला, ही गोष्ट त्याच्या मनाला अधिक लागली होती. तशांतून **वासवदत्ता** ही **दृढवर्म्यां**ची भाची असून सांप्रत ती **वत्सराजा**ची राणी झाली होती यामुळें **दृढवर्मा वत्सराजा**चा सासराच झाला होता. तेव्हां त्याला शत्रूच्या हातून सोडवून घ्यावा हें त्याचें मुख्य कर्तव्य होतें. व त्याप्रमाणें **कलिंग**राजाला आपला शत्रु

समजून त्याचा सूड घेण्याची वत्सराजानें तयारी चालविली होती. आपण बंदिशाळेंत पडलों, पण तेथें आपल्याला मोठा लाभ झाला, या गोष्टीचें त्याला मोठें नवल वाटत होतें. तो आपला प्रियमित्र वसंतक याला ह्मणाला, 'अरे, काय सांगावें, ह्या बंधनापासून माझा मोठा उत्कर्षच झाला. मी शत्रूच्या कैदेंत होतों; तरी माझे सर्व कामदार माझ्याशीं एकनिष्ठपणानें व इमानें इतबारें वागले. यौगंधरायणादिक माझे प्रधान, यांचें चातुर्य किती आहे, तेंही मला पाहण्यास मिळालें. माझे मित्र माझ्याविषयीं किती अगत्य बाळगतात, हें मला समजलें. प्रजेचें मजवर किती प्रेम आहे, तेंही दिसून आलें. युद्ध करण्याची जी मला उत्कट इच्छा होती तीही पूर्ण झाली. सर्व स्त्रियांत केवळ रत्नभूत अशी प्रिया वासवदत्ता मला प्राप्त झाली. तात्पर्य, शुद्ध अशा धर्मानें आचरण केल्यानें त्यापासून जसे सर्व मनोरथ पूर्ण होतात, तसे ह्या बंधनापासून माझे मनोरथ पूर्ण झाले. एकंदरींत ह्या बंधनानें मला आणखी काय मिळायचें राहिलें आहे ? सर्व कांहीं मिळालें.'

कैदेंत राहणें ही गोष्ट अतिशय लाजिरवाणी व वाईट असून वत्सराजानें तिचीच विशेष तारीफ केली, ती ऐकून वसंतकाला अंमळ राग आला. तो ह्मणाला, 'मित्रा, त्या रांडेच्या बंधनाचीच वरचेवर काय प्रशंसा करतोस! त्याचा आतां विसर पाड. जसा एखादा जंगली हत्ती नवाच पकडून आणावा, आणि तो कोठें तरी पळून जाईल ह्मणून त्याच्या पायांला मोठे लंगर बांधावे, त्याप्रमाणें तुझ्या पायांत असलेल्या बेडीचे दुवे वरचेवर

खळखळत असून त्याच्या भारानें तुला सरळ चालतांदेखील येत नव्हतें, व त्या तशा स्थितीचा राग येऊन तूं सर्पासारखा वारंवार सुस्कारे सोडीत होतास, व रात्रीं देखील तुझ्या डोळ्याला डोळा लागत नव्हता; असें असून त्या बंधनाची आतां काय तारीफ करतोस!'

हें ऐकून राजा ह्मणाला, 'अरे वसंतका, खरोखर तूं अगदीं दुर्जन आहेस. तुझ्या अंगीं गुणग्राहकता म्हणून कसली ती मुळींच नाहीं. अरे, तूं तो बंधनरूपी गहन अंधकार पाहिलास;पण त्यांतच उदय पावलेल्या वासवदत्तेच्या मुखचंद्राची कांति पाहिली नाहींस. पायांतल्या बेडीचा खळखळ वाजणारा आवाज ऐकून तुझें डोकें फिरलें; पण प्रिय वासवदत्तेचें मधुर भाषण तुझ्या ऐकण्यांत आलें नाहीं. त्या बंदिशाळेवरचे क्रूर रक्षक यांची दृष्टि तुला असह्य वाटली, पण त्या प्रियेचे प्रेमकटाक्ष तुझ्या पाहण्यांत आले नाहींत. तूं त्या बंधनाचे दोष तेवढे पहातोस; पण त्यापासून प्राप्त झालेल्या वासवदत्तेचे गुण पहात नाहींस!'

हें ऐकून वसंतक मोठ्या ताठ्यानें म्हणाला, 'बरें, तुझ्या म्हणण्याप्रमाणें बंदिशाळा ही अत्यंत सुखकारक होते असें जर असेल, तर दृढवर्म्याला कलिंगराजानें बंधनांत ठेवलें, म्हणून तूं त्याच्यावर कां रागावतोस? व त्याचा सूड घेण्याची तुझी तयारी आहे, ती तरी कां?'

वत्सराज ह्मणाला, 'छत् मूर्खा! हें तुला कसें समजत नाहीं? अरे, सगळेच कांहीं वत्सराज असतात असें नाहीं. बंधनांत राहून मी वासवदत्तेला हरण करून मोकळा झालों, ह्मणून ती गोष्ट सर्वांच्याच हातून

होण्याचा संभव नाहीं, व त्यांना तशी संधिही मिळण्याचा संभव नाहीं. तेव्हां माझी आणि इतरांची तुलना करतोस, याला काय ह्मणावें? बरें, आतां या गोष्टी राहूं देत. तुझ्यासारख्या वेड्याजवळ त्या बोलून काय उपयोग!'

वत्सराज उज्जयिनींतून पळून येत असतां, भिल्लांचा राजा विंध्यकेतु यानें त्याला कांहीं हरकत केली होती. त्याचा समाचार घेण्याकरितां राजानें आपला सरदार विजयसेन याला पाठविलें असून त्यानें विंध्यकेतूला ठार केला, हें वर सांगितलेंच आहे. वत्सराजाला यावेळीं विजयसेनाची आठवण झाली. तो ह्मणाला, 'अरे, विंध्यकेतूचा पराभव करण्याकरितां विजयसेनाला पाठविलें त्याला आज पुष्कळ दिवस झाले असून अद्याप त्याचा कांहींच समाचार कळला नाहीं. तेव्हां त्याचें काय झालें, याची मला मोठी काळजी लागली आहे. तर आपला सेनापति रुमण्वान् याला बोलावून आणीव. त्याला तिकडच्या हकीगतीच्या संबंधानें कांहीं विचारावयाचें आहे.'

चोपदारीण जवळ उभीच होती. वसंतकानें रुमण्वानाला बोलावून आण, असें सांगतांच ती तिकडे गेली. राजाला विजयसेनाची आठवण होण्याला आणि विजयसेन येऊन पोंहोचण्याला अगदीं गांठ पडली. विजयसेन हा एक मोठा सरदार होता, तरी मुख्य सेनापति रुमण्वान् याच्या हाताखालचा होता. ह्मणून तो प्रथम रुमण्वानाला जाऊन भेटला. मोहिमेवर पाठविल्याप्रमाणें काम फत्ते करून आल्यामुळें सेनापतीला फार आनंद झाला. व हें वर्तमान राजाला कळवावें ह्मणून तो विजयसेनाला

बरोबर घेऊन इकडे यावयाला निघालाच होता. इत-क्यांत चोपदारणीनें मुजरा करून त्याला राजाचा हुकूम कळविला, व तिच्यासह ते दोघेही राजा ज्या महालांत बसला होता त्याच्या दरवाज्याशीं येऊन पोंचले.

चोपदारणीनें आंत जाऊन राजाला कळविलें, व त्याच्या हुकुमानें रुमण्वान् आणि विजयसेन यांला आंत घेऊन गेली. रुमण्वान हा वत्सराजाला केवळ धन्याच्याच नात्यानें ओळखीत नव्हता, तर तो त्याचा बालमित्र होता. व त्या उभयतांत कांहींच परकीय भाव नव्हता; तरी यावेळीं राजाला पाहून त्याला किं-चित् भय वाटलें. तो आपल्याशींच ह्मणाला, नुकतीच यजमानांची भेट घेऊन, पुनः भेटीचा प्रसंग आला असतां, आपल्या अंगीं कांहीं दोष नसतांही जणूं काय आपण दोषीच आहों, अशी राजासमोर जातांना कामदारांला बहुतकरून शंका उत्पन्न होते हें काय? एकंदरींत प्रभुसत्तेचें तेजच तसें आहे. !

रुमण्वान् राजाच्या अगदीं जवळ जाऊन पोहोंचला, व त्यानें संप्रदायाप्रमाणें 'महाराजांचा जयजयकार असो!' असें ह्मणून मुजरा केला. तेव्हां जवळ ठेवलेल्या आ-सनावर राजानें त्याला बसावयास सांगितलें. विजयसेन मुजरा करून राजाच्या पुढें हात जोडून उभा राहिला.

नंतर रुमण्वान् आनंदित मुद्रेनें राजाला ह्मणाला, 'हा विंध्यकेतूला जिंकून आलेला विजयसेन महाराजांला नमस्कार करायला आला आहे.'

शूर सरदारांनीं किंवा इतर कोणत्याही कामदारांनीं कांहीं मोठी कामगिरी बजाविली असतां त्यांला यजमा-

नाकडून योग्य बक्षीस मिळण्याची मोठी आशा असते. पण ती पेक्षांही, धन्यानें आपलें गौरव करावें, असें ते मनापासून इच्छित असतात. विजयसेन हात जोडून पुढें उभा राहिला होता, तरी तो विजयी होऊन आला आहे हें राजाला माहीत नव्हतें. प्रधानानें सांगितल्यावरून राजाला फार आनंद झाला, व तत्काल त्यानें आपल्या त्या शूर सरदाराला प्रेमानें आलिंगन दिलें, व तूं सुखरूप आहेसना ? ह्मणून प्रश्न केला.

विजयसेन ह्मणाला, 'होय, आज सरकारच्या कृपेनें माझें कुशल आहे.' इतक्यांत राजानें त्याला आसन देण्याविषयीं आज्ञा करून खालीं बसावयास सांगितलें. राजाला मुजरा करून विजयसेन मोठ्या नम्रतेनें आसनावर बसला. तेव्हां राजा ह्मणाला, 'शूरा विजयसेना, विंध्यकेतूकडची काय हकीकत झाली ती सांग पाहूं.'

विजयसेन ह्मणाला, 'सरकार, दुसरें काय होणार ? महाराज रागावले असतां त्याचा जो परिणाम व्हायचा तोच झाला.'

राजा म्हणाला, 'तरी हेंच विस्तारपूर्वक ऐकण्याची माझी इच्छा आहे.'

विजयसेन ह्मणाला, 'सरकार, येथून आम्ही हुजूरचा हुकूम घेऊन हत्ती, स्वार, पायदळ इत्यादि प्रकारचें चतुरंग सैन्य बरोबर घेऊन, कूच दर कूच करीत करीत तीन दिवसांनीं तेथें पोहोंचलों; व चवथे दिवशीं अगदीं प्रभातकाळीं एकाएकीं विंध्यकेतूवर आम्हीं छापा घातला.'

राजा ह्मणाला, 'शाबास ! फार चांगलें केलें. बरें पुढें काय झालें ?'

विजयसेन ह्मणाला, 'नंतर तो विंध्यकेतु आमच्या फौजेची गडबड ऐकून, जागा झालेल्या सिंहानें गुहेंतून बाहेर निघावें त्याप्रमाणें विंध्यपर्वताच्या खोऱ्यांतून वर आला. तो अगदीं गाफल होता. एकाएकीं आमचा हल्ला झाल्यावरून, त्यावेळीं जे कोणी मिळाले त्यांची मदत घेऊन, तो आमच्याशीं लढूं लागला.'

वत्सराज मोठ्या उदार मनाचा होता. विंध्यकेतु हा त्याचा शत्रु खरा, तरी विशेष तयारी नसतांही तो एकदम लढाई करण्यास प्रवृत्त झाला, हें ऐकून राजाला संतोष वाटला. तो रुमण्वानाकडे पाहून हंसत ह्मणाला, 'त्या शूरानें असें केलें हें त्याला मोठें भूषण आहे. बरें, मग पुढें काय झालें?'

विजयसेन ह्मणाला, 'आह्मांला त्याची ओळख नव्हती, तरी अजमासानें, विंध्यकेतु ह्मणतात तो हाच, असें समजून पहिल्यापेक्षां दुप्पट उत्साह वाटला, व आमचा रागही दुणावला. आह्मीं एकसारखी कत्तल सुरू केली. त्याच्याबरोबरच्या लोकांपैकीं एकही तेथें उरूं दिला नाहीं. बहुतेक सर्व मेले, व अलपस्वल्प राहिले ते पळून गेले. याप्रमाणें आह्मीं त्याचा मोड केला, तरी तो एकटाच, पर्जन्यकालच्या मेघाप्रमाणें, आह्मांवर बाणवृष्टि करीत होता. व आह्मी चहूंकडून घेरलें असतांही त्यानें कांहीं वेळ मुळींच दाद दिली नाहीं.'

हें ऐकून राजाला मोठें समाधान वाटलें. तो ह्मणाला, 'अरे शाबास! विंध्यकेतो शाबास!'

विजयसेन ह्मणाला, 'त्याचा पराक्रम अगदीं अप्रतिम आहे; पण मी कोठवर त्याची तारीफ करूं? अगदीं

थोडक्यांत सांगतों. त्यानें प्रथमतः पायदळावर हल्ला करून त्यांची दाणादाण करून सोडली, आणि नंतर तो स्वारांवर धांवला. आपल्या बाणांच्या वृष्टीनें स्वारांला जर्जर करून हरिणासारखें त्यांला पिटाळून लावलें, आणि मग हत्तींवर त्यानें मोर्चा फिरविला. बाणांची कितीही वृष्टि केली तरी ते दाद देत नाहींत असें पाहून, तो हातांत तरवार घेऊन, जसें केळीचें वन भराभर कापतात त्याप्रमाणें, हत्तींच्या सोंडा कापीत सुटला. याप्रमाणें तीन प्रकारचें सैन्य त्यानें आपल्या पराक्रमानें अगदीं जर्जर करून सोडिलें; तरी आह्मी एकसारखे त्याच्यावर प्रहार करीतच होतों. नंतर पुष्कळ वेळ लढून श्रमलेला व शस्त्रांच्या प्रहारानें व्यथित झालेला, असा तो आपला शत्रु विंध्यकेतु, याला आह्मीं खालीं पाडलें !'

विंध्यकेतूचें शौर्य पाहून राजा सेनापतीला ह्मणाला, 'रूमण्वान्, शूर पुरुषाला योग्य अशा मार्गानें जाणाऱ्या विंध्यकेतूच्या मरणानें खरोखर आह्मांस लाजविलें, यांत कांहीं शंका नाहीं. अशा शूराला आह्मीं मारलें ही गोष्ट मोठी लज्जास्पद आहे.'

रूमण्वान् म्हणाला, 'महाराज, केवळ गुणांला चहाणाऱ्या आपल्या सारख्या थोरांला शत्रूचे देखील गुण ऐकून आनंद होतो, हें योग्यच आहे.'

वत्सराज विजयसेनाला ह्मणाला, 'अरे, विंध्यकेतु तर मेलाच; पण त्याचें कोणी मूलबाळ आहेका ? मला जो त्याच्या पराक्रमाविषयीं आनंद झाला आहे तो, त्याची संतति असेल तर, तिचें कल्याण करून प्रदर्शित करावा असें मी म्हणतों.'

विजयसेनानें प्रियदर्शिकेला बरोबर आणली होती हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्यानें, 'तू कोणाची कोण?' म्हणून तिला विचारिलें होतें; पण प्रियदर्शिकेनें, अशा स्थितींत आपलें कुळ सांगून वाडवडिलांना डाग लावावा किंवा त्यांचा अपमान करावा, त्यापेक्षां मुळींच सांगूं नये, असा विचार करून विजयसेनाला कांहींच सांगितलें नव्हतें. जेव्हां जेव्हां तिला तो विचारी तेव्हां तेव्हां ती मोठ्यानें रडत असे. यामुळें विजयसेनाला ती कोणाची कोण हें मुळींच कांहीं कळलें नाहीं. तथापि अनुमानावरून ती विंध्यकेतूचीच मुलगी किंवा दुसरी कोणी असावी, असें तो समजला होता. यद्यपि विंध्यकेतूसारख्या जंगली भिल्लाला असें कन्यारत्न होण्याचा असंभव आहे, ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली होती; तथापि कधीं कधीं उकिरड्यांत देखील रत्न सांपडतें, तेव्हां ती विंध्यकेतूची मुलगी नसेल असेंही त्याला वाटलें नाहीं.

विजयसेनानें हावेळपर्यंत लढाईची सर्व हकीकत सांगितली; पण प्रियदर्शिकेचें त्याला स्मरणच नव्हतें. राजानें 'विंध्यकेतूचें मूलबाळ आहे का?' म्हणून विचारलें; तेव्हां प्रियदर्शिकेची आठवण झाली, व लगेच बाहेर जाऊन तो तिला आंत घेऊन आला.

दुःखानें व वनवासानें कृश व निस्तेज झालेल्या त्या मुलीला आणून विजयसेनानें दरवाज्याच्या बाहेर उभी केली आणि राजाला म्हणाला, 'सरकार, आणखी एक विनंति करायची आहे. आप्त, इष्टमित्र यांसहवर्तमान आम्हीं विंध्यकेतूला मारून त्याच्या राहण्याच्या जाग्याला आग लावली, तेव्हां विंध्यकेतूच्या व त्याच्या आप्तांच्या स्त्रि-

यांनीं त्या अग्नींत प्रवेश केला. व जे कोणी जिवंत राहिले होते, ते भयानें, ज्याला जिकडे वाट फुटेल तिकडे, पळून गेले. यामुळें ती जागा अगदीं निर्मानुष झाली. नंतर आम्ही परत यायला निघालों, तेव्हां जवळच एका झाडाखालीं—हे ताता ! हे ताता ! असा आक्रोश करीत रडत बसलेली एक कन्या आमच्या दृष्टीस पडली. कुलीन कन्येला योग्य असें तिचें रूप व चालचर्या पाहून, कदाचित् ती त्याचीच मुलगी असेल असें समजून, आम्हीं तिला येथें आणली आहे. ती बाहेर दरवाज्यांत उभी आहे. यावर जसा सरकारचा हुकूम होईल तसें करतां येईल.'

हें ऐकून राजानें दुःखीकष्टी झालेल्या त्या मुलीला आपल्या समोर आणण्याविषयीं हुकूम न करतां, जवळ उभी असलेल्या **यशोधरा** नांवाच्या चोपदारणीला तो म्हणाला, 'अग **यशोधरे**, लवकर जा आणि हा **विजयसेन** सांगतो त्याप्रमाणें ती मुलगी बाहेर असेल, तिला नेऊन **वासवदत्तेच्या** स्वाधीन कर; व तिला असें सांग कीं, ह्या अनाथ मुलीला आपली बहीण असें समजून नेहमीं तूं आपल्या जवळ बाळग. थोरामोठ्यांच्या मुलीला योग्य असें गायन, नृत्य, वाद्यें वाजविणें, इत्यादिक प्रकारचें शिक्षण तिला द्यावें, व जेव्हां ती लग्नाला योग्य होईल तेव्हां मला आठवण दे, म्हणजे तिची योग्य व्यवस्था करूं.'

राजाचा हुकूम ऐकून चोपदारीण, 'हुकुमाप्रमाणें करतें' असें सांगून त्या मुलीला घेऊन राणीकडे गेली. तिनें राणी वासवदत्तेला मुजरा करून, राजाचा निरोप कळ-

विला व प्रियदर्शिकेला तिच्या स्वाधीन केलें. याप्रमाणें आमच्या ह्या कथेची नायिका प्रियदर्शिका ही, स्वतः एका मोठ्या राजाची मुलगी व राणी वासवदत्तेची मावसबहीण असून, दैवाच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें तिची विलक्षण दुर्दशा होऊन ती अनाथासारखी प्रत्यक्ष आपल्या बहिणीच्याच घरीं तिच्या आश्रयाला राहिली!

इतक्यांत दोनप्रहरचा समय झाला; तो सुचविण्याकरितां भाट ह्मणाला, 'महाराज, सांप्रत मंगलस्नानाला उपयुक्त असें सर्व साहित्य तयार करून सर्व अंतःपुरांतील स्त्रिया, श्रमानें खालीं पडलेल्या पदराचें व्यवधान नसल्यामुळें स्पष्ट दिसणाऱ्या आपल्या स्तनरूपी सोन्याच्या कलशांनीं महाराजांची स्नान करण्याची जागा शोभवीत होत्सात्या, सरकारची वाट पहात आहेत.'

भाटाची ही सूचना ऐकून राजा वर पाहून ह्मणाला, 'अरे! खरेंच भगवान् सहस्रकिरण सूर्य सांप्रत आकाशाच्या मध्यावर आला आहे, व त्यामुळें त्याच्या किरणांनीं लहान लहान तळ्यांतलें उदक, आंतील मासे वर उसळ्या मारीत असल्याकारणानें, जणुं काय कढत आहे असें वाटतें. मोर नृत्य करून करून शिथिल झाले आहेत, तरी ते आपले पंख उन्हाचा ताप न व्हावा ह्मणून, छत्रीसारखे वर करीत आहेत. झाडांच्या आळ्यांत घातलेलें पाणी पिण्याविषयीं लुब्ध झालेले, तान्हेलेले हरिणाचे छावे वृक्षांच्या मुळांकडे जात आहेत. हे हत्तींच्या गंडस्थलांवरील मद प्राशन करण्याविषयीं लुब्ध झालेले भ्रमर, गंडस्थल तापल्यामुळें, त्यांच्या कानांच्या पाळींत शिरताहेत.'

रुमण्वानाला ह्मणाला, 'रुमण्वान्, ऊठ लवकर, आज येथेंच स्नान भोजन वगैरे आटपून घे. विजयसेनालाही येथेंच ठेवून घे. मग विशेष विचार करून याला कालिंग-राजाचा समाचार घेण्याकरितां पाठवूं.' असें सांगून रुमण्वान् व विजयसेन यांसहवर्तमान वत्सराज स्नान करावयास गेला.

---

## भाग दुसरा.

राणी वासवदत्ता मोठी धार्मिक होती. त्यांतून आपल्याला उत्तम गुणवान् पुत्र प्राप्त व्हावा अशी तिला फारच इच्छा होती. ती नेहमीं कांहींतरी व्रतें वैकल्यें करीत असे. देवब्राह्मणांची पूजा करण्यांत तिला मोठा आनंद वाटत असे. सांप्रत तिनें कांहीं व्रत घेतलें होतें, त्यासंबंधानें सांगितलेल्या नियमांप्रमाणें वागायाचें होतें ह्मणून, तिनें राजाचीदेखील भेट घेतली नाहीं. तथापि त्याच्यावर तिचें अत्यंत प्रेम असल्यामुळें ती फार उत्कंठित झाली होती.

या दिवशीं तिच्या व्रताची सांगता होती. सांगतेकरितां पुष्कळ ब्राह्मणांना दक्षिणा, वायनें, वस्त्रपात्रें इत्यादिक ती देणार होती. त्यांतच राजाचा प्रियमित्र वसंतक यालाही एक वाण द्यावें असें तिच्या मनांत आलें; ह्मणून तिनें इंदीवरिका नांवाच्या आपल्या दासीला वसंतकाला बोलावून आणण्यास सांगितलें. त्याप्रमाणें इंदीवरिकेनें कळविल्यावरून वसंतक राणीकडे जाण्यास निघाला.

तो आपल्याशींच ह्मणाला, आज राणीनें वाण दे-

ण्याकरितां मला बोलाविलें आहे, तेव्हां बरीच चंगळ उडणार आहे. आतां आपण ह्या धारागृह नामक उद्यानाच्या जवळच्या तळींत स्नान करून, हळूच राणीजवळ जाऊन, कोंबड्यासारखें कुकूकू ! करून ओरडावें. ह्मणजे झालें! अशी कांहीं चावटगिरी केली नाहीं तर आमच्या सारख्या ब्राह्मणाला राजवाड्यांत दानदक्षिणा कोठून मिळणार? राणीला अंमळ हंसविली ह्मणजे ती कांहीं तरी आमच्या कपाळावर घालील! असा विचार करून वसंतकानें धारागृहोद्यानांत जाऊन तेथील तळींत स्नान केलें. त्याचें आन्हिक बेताबाताचेंच होतें. शेंडी झाडून स्वारी वाण घेण्यास जाण्याकरितां तयार झाली.

इतक्यांत आपल्या दर्शनाविषयीं राणी अतिशय उत्कंठित झाली आहे असें समजल्यावरून, व्रताची सांगता होतांक्षणींच, तिला भेटावें या हेतूनें वत्सराजही तिकडेच जावयास निघाला होता. उभयतांची त्या तळीवर गांठ पडली. राणी धारागृहांतच व्रत घेऊन बसली होती. राजा तिच्या भेटीला जातो आहे असें पाहून वसंतकानेंही त्याच्या बरोबरच जाण्याचा निश्चय केला.

जशी वासवदत्ता राजाच्या भेटीविषयीं उत्कंठित झाली होती, तसा तोही तिच्या भेटीविषयीं उत्कंठित झाला होता. व्रतस्थ असलेल्या राणीला दुरून पाहून वत्सराज ह्मणाला, ‘ जिचें अंग सुकून गेलें आहे, केवळ सौभाग्यकारक एवढेच मात्र दागिने जिनें अंगावर धारण केले आहेत, उपोषणांनीं अशक्त झाल्यामुळें मंद चालणारी व पांढरें फटिक दिसणाऱ्या मुखानें निस्तेज झालेल्या प्रातःकाळच्या चंद्रासारखी दिसणारी, माझ्या

भेटीविषयीं उत्कंठित झालेली असून केवळ नियमानें बांधल्यामुळें कसा तरी वेळ काढणारी, अशा ह्या प्रियेला पाहून अगदीं पहिल्याप्रथम स्त्रीपुरुषांची भेट होण्याच्या वेळीं जशी उत्कंठा लागते, तशी मला यावेळीं लागली आहे!'

इतक्यांत वसंतक पुढें येऊन त्यानें राजाला आशीर्वाद दिला. यावेळीं वसंतकाची मुद्रा आनंदित दिसत होती, ती पाहून राजा ह्मणाला, 'अरे, आज तूं मोठ्या खुषींत असल्यासारखा दिसतोस याचें काय कारण?'

वसंतक म्हणाला, 'तुला ठाऊक नाहीं? आज राणी अस्मादिकांची पूजा करणार आहे!'

राजा म्हणाला, 'मग त्यांत इतकें खुष होण्याचें काय कारण?'

हें ऐकून वसंतक मोठ्या ताठ्यानें म्हणाला, 'अरे, खुष होण्याचें कारण काय म्हणजे? हा ब्राह्मण कांहीं असा तसा नाहीं. याला चार वेद, पांच वेद, सहा वेद असे पुष्कळ वेद येत असून, हजारों दुसरे ब्राह्मण या राजदरबारांत येणारे जाणारे असतां त्या सर्वांच्या आधीं मलाच राणी वाण देणार आहे! तेव्हां ही काय लहानसहान गोष्ट आहे?'

हें ऐकून राजा हंसून ह्मणाला, 'आपली काय गोष्ट सांगायची आहे? आपण मोठेच विद्वान् पडलां. वेदांची संख्या सांगितलीत तीवरूनच आपण आपलें ब्राह्मण्य* व्यक्त

* वेद अवघे चारच असून वसंतकानें पांच सहा अशी त्यांची संख्या सांगितली, यावरून वेद किती आहेत, हेंदेखील ज्याला

केलेंत ! बरें, तें असो. अरे महा ब्राह्मणा, चल आतां आपण धारागृहोद्यानांतच जाऊंया.' असें बोलून राजा त्याला बरोबर घेऊन गेला.

त्या धारागृहोद्यानाची अत्यंत रमणीय शोभा पाहून वसंतक राजाला म्हणाला, 'मित्रा, पहा पहा, येथील शिलातलावर एकसारखीं अनेक फुलें पटापट् पडत आहेत. फुलांच्या वासाला लुब्ध झालेल्या भ्रमरांनीं बकुल, मालती इत्यादिकांना व्यापून टाकलें आहे. कमलांचा सुवास ग्रहण करून उद्दाम होऊन वाहणारा वायु मनाला आनंद देत आहे. दाट अशा तमालवृक्षांनीं सूर्याला जणूं काय झांकूनच टाकलें आहे. अशा ह्या धारागृहोद्यानाची रमणीय शोभा अवलोकन कर.'

राजा म्हणाला, 'गड्या, चांगलें बोललास. येथें राननिर्गुंडीच्या फुलांच्या वरचे लहान लहान पल्लव खालीं पडून त्यांनीं जमीन झांकून गेली आहे. सप्तपर्णवृक्षाचा* वास इतका उग्र येत आहे कीं, तो हत्तींच्या मदाचाच वास आहे कीं काय, असें वाटतें. तसेंच प्रफुल्लित झालेल्या कमलांतील मधु (मद्य) यथेष्ट प्राशन करून उन्मत्त झालेले व कमलाच्या आंतील रजःकणांनीं

---

माहीत नाहीं, त्याला त्यांचें ज्ञान काय असणार ! असा राजाच्या बोलण्याचा अभिप्राय.

* मराठी भाषेंत ज्याला सात्विणीचें झाड ह्मणतात तोच सप्तपर्णवृक्ष असें पुष्कळांचें म्हणणें आहे. तथापि सात्वीण अथवा सातपानी हें झाड फार लहान असतें व सप्तपर्णवृक्ष मोठमोठे असल्याचें पुष्कळ ठिकाणीं वर्णन येतें. त्यावरून तो तोच असावा असा निश्चय करतां येत नाहीं.

ज्यांच्या अंगाचा रंग पिंगट झाला आहे, असे हे भ्रमर कांहीं तरी यथेच्छ गायन करीत आहेत.'

**वसंतक** पुनः ह्मणाला, 'होहो! ही काय मौज आहे पहा. ह्या सप्तपर्णवृक्षाचीं फुलें एकसारखीं टपटप खालीं पडत असल्यामुळें वर्षाकालांतल्या पावसाच्या पाण्याचे थेंब अद्याप याच्या पानांवरून खालीं पडताहेत कीं काय असें वाटतें!'

हें ऐकून राजा त्या झाडाची शोभा पाहून ह्मणाला, 'गड्या, चांगली उत्प्रेक्षा केलीस. पर्जन्यकाळाचीं बहुतशीं लक्षणें येथें दिसतात खरीं. वरचेवर पाणी शिंपून गार केल्यामुळें जवसाच्या फुलांची शोभा हरण करणारी कोंवळी हराळी एकसारखी सर्वत्र उगवली आहे, यामुळें हें स्थल पाचेची फरसबंदी केल्यासारखें दिसतें. व वरच्या पानांच्या बंधनापासून मुक्त झालेलीं हीं दुपारीचीं फुलें खालीं पडल्यामुळें, पर्जन्यकाळीं दिसणारे इंद्रगोप* नांवाचे किडे सभोंवतीं बसले आहेत कीं काय असें दिसतें.' याप्रमाणें **धारागृहोद्यानाची** शोभा वर्णन करीत करीत उभयतां राणीकडे गेले.

याच दिवशीं राणी **अगस्त्यऋषीची** पूजा करून त्याला अर्घ्यप्रदान करणार होती. त्यांत निर्गुंडीचीं फुलें अवश्य असावीं असें शास्त्रांत सांगितलें आहे. ह्मणून राणीनें **इंदीवरिकेला**, निर्गुंडीचीं फुलें आणून

* पावसाळ्यांत हिरव्या गवतावर हे एक प्रकारचे किडे बसतात. यांचा रंग कांहीं तांबूस व काळसर असा असतो. यांला संस्कृत भाषेत इंद्रगोप ह्मणतात. मराठींत यांचें नांव काय आहे समजत नाहीं.

त्यांची माळ तयार करून घेऊन ये, असें सांगितलें होतें. ह्मणून इंदीवरिका निर्गुंडीचीं फुलें आणण्याकरितां त्याच बागेंत आली. तिच्यापूर्वी प्रियदर्शिकेला तळींतलीं कमलें आणण्याकरितां राणीनें पाठविलें होतें. राणीनें सांगितल्याप्रमाणें इंदीवरिका धारागृहोद्यानांत जाऊन आपल्याशींच ह्मणाली, आतां आपण हिकडे तिकडे गमतां उपयोगी नाहीं. निर्गुंडीच्या फुलांची माळ तयार करून लवकर बाईसाहेबांला नेऊन दिली पाहिजे.

इंदीवरिका, निर्गुंडीचीं फुलें काढीत काढीत, तेथील तळीच्या जवळ पोंचली, तों प्रियदर्शिकाही तिच्या दृष्टीस पडली. प्रियदर्शिकेला ती तळी कोठली, व कोठें आहे, हें मुळींच माहीत नव्हतें. तिला पाहून इंदीवरिका आपल्याशींच ह्मणाली, ही बिचारी आरण्यका, हिला बाईसाहेबांनीं—सूर्य अस्ताला जाऊं लागून कमलें मिटल्यापूर्वींच तीं लवकर घेऊन ये, असें सांगितल्यावरून ही कमलें आणावयास निघाली आहे; पण हिला ती तळी कोठें आहे तें मुळींच ठाऊक नाहीं. तेव्हां आतां ही काय करील? आपण फुलें वेंचीत वेंचीत तळीकडे जाणारच आहों, तेव्हां हिलाही बरोबर न्यावी, ह्मणजे झालें. असा विचार करून आरण्यकेला हांक मारून ह्मणाली, 'अग आरण्यके, अग आरण्यके, अशी हिकडे ये.'

यावेळीं आरण्यकेला आपल्या पूर्वस्थितीची आठवण होऊन तीला अतिशय दुःख झालें होतें. ती डोळ्यांत पाणी आणून व उद्विग्न होऊन आपल्याशींच ह्मणाली, हाय हाय! मी केवढ्या मोठ्या कुळांत उत्पन्न झालें आहें! शेंकडों मनुष्यांवर माझा हुकूम चालत होता, तीच मी आज

दुसऱ्याची आज्ञा मस्तकावर धारण करीत आहें. शि-व शिव ! मेल्या दैवाला दुष्कर ह्मणून कांहींएक नाहीं. सुस्कारा सोडून ह्मणाली, पण दैवावर तरी बोल कां ठेवावा ! मला असें हीनपण प्राप्त झालें, हा माझाच अपराध आहे. पुढें अशी दुसऱ्याची चाकरी करावी लागेल हें त्यावेळींच माझ्या लक्ष्यांत आलें होतें. असें असून मी तेव्हांच जीव द्यायचा सोडून हावेळपर्यंत वांचलें त्याचें हें फळ यावेळीं मला भोगावें लागत आहे. पण आतां काय उपयोग ? मी जीव देणार ह्मटलें, तरी आतां मला तसें करण्यास मिळायचें नाहीं. ही एक गोष्ट मी बरी केली कीं, आपलें कूळ कोणाला सांगितलें नाहीं. नाहींतर त्या मोठ्या वंशाचें नांव सांगून मी आ-पल्याला फारच हलकें करून घेतलें असतें. असो. आतां दुसऱ्याची चाकरी न करून कसें चालेल ? बाईसाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें लवकर कमलें घेऊन जावें हेंच बरें.

प्रियदर्शिकेला राजानें राणीकडे पाठविलें होतें, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आतां त्यानंतर तिची कशी काय अवस्था झाली तें पाहूं या. राजाच्या सांगण्याप्रमाणें राणी वासवदत्तेनें प्रियदर्शिकेचें फार उत्तम प्रकारें सं-गोपन चालविलें होतें. ती तिला आपल्या बहिणीप्रमाणें मानीत होती. तिच्या गणगोताचा वगैरे कांहीं शोध लागला नाहीं व प्रियदर्शिकनेही आपल्या आईबापांचीं नांवें उघड केलीं नाहींत, इतकेंच नव्हे, तर स्वतःचें नांव काय हें देखील तिनें कोणास सांगितलें नाहीं ! तेव्हां राणीनें तिचें आरण्यका असें नांव ठेविलें. कारण, ती अरण्यांत सांपडली होती व तिचें विशेषनाम माही-

त नव्हतें ह्मणून तिनें तेंच नांव प्रचारांत आणलें. राणी तिला **आरण्यका** ह्मणूं लागली, तेव्हां राजवाड्यांतील सर्व मंडळी तिला त्याच नांवानें हांक मारूं लागली.

राणी **वासवदत्ता** ही मोठी ममताळू होती व ती **आरण्यके**ला कधींही धिम्मकिस् करीत नव्हती. तरी इतर नोकरचाकर तिला राणीप्रमाणेंच वागवीत होते असें नाहीं. यामुळें **राजानें**, **वासवदत्ते**ला तिला आपल्या बहिणीप्रमाणें वागविण्यास सांगितलें होतें व तीही तसेंच मानीत होती, तरी इतर लोक **आरण्यके**ला बाकीच्या कुळंबिणींपैकीं एक कुळंबीण असेंच समजत होते व खरोखर बटकींतच तिची गणना झाली होती.

**इंदीवरिकेनें** प्रथम तिला हांक मारली, तरी **आरण्यके**चें तिकडे मुळींच लक्ष्य नव्हतें. तिनें कांहीं उत्तर दिलें नाहीं, असें पाहून **इंदीवरिकेनें**, ‘अग **आरण्यके**, अशी हिकडे ये, ह्मणून तिला पुनः सांगितलें. तेव्हां **आरण्यका**—‘ही आलें’ असें ह्मणून तिच्याकडे गेली. तिला चालण्याचा मुळींच अभ्यास नव्हता. त्यामुळें श्रमल्यासारखी होऊन ती **इंदीवरिके**ला ह्मणाली, ‘अग, अजून ती तळी किती तरी दूर आहे!’

**इंदीवरिका** ह्मणाली, ‘अग, आतां दूर कसली! ह्या निर्गुडीच्या ताटव्याच्या पलीकडेस आहे. चल आपण तिकडेच जाऊं या,’ असें बोलून दोघीही तिकडे गेल्या. नंतर **आरण्यका** तळींत उतरून कमळें काढूं लागली.

**वत्सराज** राणीकडे जाण्यास निघाला होता हें वर सांगितलेंच आहे. तो त्या बागेची शोभा पहात पहात रमत चालला होता. त्यानें—पावसाळ्यासारखी येथील

शोभा दिसते, असें जें वर्णन केलें होतें त्याविषयीं **वसं-तक** विचार करीत होता. त्यावर **राजा** ह्मणाला, 'अरे, विचार कसला करतोस! मी सांगतोंना, पर्जन्य-काळासारखी येथील शोभा दिसते असें जें मीं म्हटलें तेंच खरें.'

**राजा** रमत रमत चालला होता; पण **वसंतकाला** तें आवडत नव्हतें. आपण लवकर राणीजवळ जाऊन तें वायन कधीं घेऊं, असें त्याला झालें होतें. **राजाच्या** भि-डेस्तव त्यानें वनशोभेचें बराच वेळ वर्णन केलें, तरी त्याचें तें चऱ्हाट आटपत नाहीं असें पाहून, तो रागावून म्हणाला, 'वाहवा! फार चांगला उद्योग! तुला आपल्या बायकोची अतिशय उत्कंठा लागली आहे, म्हणून ती व्रताची सांगता करून मोकळी होईपर्यंत कशीतरी कर्मणूक करून वेळ घालविण्यासाठीं तूं कांहींतरी व-र्णन करीत आहेस. पण मी आपला गरीब ब्राह्मण, वाण देण्याची वेळ चुकेल, याची काळजी करितों आहें. तुला काय! उशीर लागला तर माझें वाण बुडेल, तर मला आतां सोड. मी लवकर राणीकडे जाऊन दान एकदांचें पदरांत घेतों. मग आपला हवा तितका वेळ तुझ्याशीं खेळत बसेन.'

राजा म्हणाला, 'अरे, तूं तर खरोखर अगदीं मूर्खच आहेस! अरे, आतां आम्ही या तळीच्या जवळ आलों आहों. यावेळीं सर्व इंद्रियांला अत्यंत सुख प्राप्त होत आहे. असें असूनहीं खादाडासारखा तूं त्या वायनाची काळजी करतोस, याला काय म्हणावें!'

'अरे असा इकडे पहा. हा हंसपक्ष्यांचा मधुर

शब्द, आवडत्या माशुकाच्या पायांतल्या पैंजणांच्या आवाजाप्रमाणें, कानांला रमवितो आहे. आसमंतात् एकसारखी दिसणारी ही राजबंगल्याची रांग डोळ्यांला अतिशय प्रीति देत आहे. तसेंच या कमलांच्या वासानें नासिकेला फार सौख्य होतें; व हे सुगंधिक वायु अंगाला शीतल स्पर्श करून विशेष हुषारी आणताहेत. तर यावेळीं तुझें तें वाण असूदे एकीकडे. ह्या तळीच्या कांठीं बसून घटकाभर मनाची करमणूक करूंया.'

तळीची शोभा पाहून ह्मणाला, 'पहा पहा! ही बाग हीच कोणी एक देवता. आणि हिची प्रफुल्लित झालेल्या कमलाच्या कांतीसारखी स्वच्छ जणूं काय दृष्टिच आहे, अशी ही तळी पाहून माझें मन अतिशय रमतें.'

वसंतकाच्या मनांत लवकर राणीकडे जायाचें होतें, पण राजा त्याला जाऊं देईना. तेव्हां निरुपायास्तव त्याला त्याच्याबरोबर राहणें भाग पडलें. उभयतां त्या तळीच्या कांठावर जाऊन बसले. इतक्यांत आरण्यका आणि इंदीवरिका ह्या दोघी तेथें होत्या, त्या त्यांच्या दृष्टीस पडल्या. आरण्यकेचें अप्रतिम सौंदर्य पाहून वसंतक मोठ्या कौतुकानें ह्मणाला,' मित्रा, अरे, हिकडे पहा, हिकडे पहा! फुलांच्या सुगंधाला लुब्ध झालेली भ्रमराच्या पंक्तीसारखी जिची वेणी दिसत आहे, व पोंवळ्यासारखे जिचे ओंठ अतिशय लाल दिसत आहेत व जिचे बाहु कोमल वेलीसारखे दिसत आहेत, अशी ही स्त्री प्रत्यक्ष वनदेवतेसारखीच दिसते, हिच्याकडे अंमळ पहा.'

हें ऐकून राजा कौतुकानें तिच्याकडे पाहून ह्मणाला, 'खरेंच. अतिशय उत्तम अशा स्वरूपाच्या शोभेनें जिनें माझ्या मनांत अनेक कल्पना उत्पन्न केल्या आहेत अशी ही कोण आहे, हें कांहीं खरोखर माझ्या लक्ष्यांत येत नाहीं. हिचें रूप अत्यंत दर्शनीय आहे.'

'ही ह्या लोकाची शोभा पहावी ह्मणून पातालांतून प्रत्यक्ष नागकन्याच वरती आली आहे असें वाटतें; पण ही कल्पना देखील खोटी आहे. कारण, नागकन्येच्या अंगीं इतकें सौंदर्य कोठून असणार! आतां ही प्रत्यक्ष चंद्राची कांतिच आहे असें ह्मणावें, तर दिवसास चंद्रिकेचें दर्शन कोठून घडेल! तेव्हां हातांत कमल असल्यामुळें प्रत्यक्ष लक्ष्मीसारखीच दिसणारी, अशी ही कोण आहे?'

आरण्यकेला राणीच्या हवालीं केली, त्याला पुष्कळ दिवस झाले, तरी ती यापूर्वीं राजाच्या कधींच पाहण्यांत आली नव्हती. राजाला एकाएकीं तिचें अप्रतिम सौंदर्य पाहून मोठें आश्चर्य वाटलें.

वसंतकाला तिची ओळख होतीच. तो तिच्याकडे लक्ष्यपूर्वक पाहून ह्मणाला, 'ही इंदीवरिका हिच्या बरोबर आहे, तेव्हां आपण ह्या वेलीच्या कुंजाच्या आड उभे राहून पाहूंया, ह्मणजे ही अशी सुंदरी कोण आहे तें या उभयतांच्या संवादावरून सहज व्यक्त होईल.'

वसंतकाची ही युक्ति राजाला पसंत पडली, व ते दोघेही कुंजाच्या आड जाऊन बसले. हिकडे इंदीवरिका कमलांचीं पानें काढून म्हणाली, 'अग आरण्यके, तूं कमळें काढ, तोंपर्यंत मी कमलिनीचीं पानें काढून त्यांत

हीं निर्गुंडीचीं फुलें घेऊन बाईसाहेबांकडे जातें.' असें बोलून ती जाण्यास निघाली.

तेव्हां **आरण्यका** बावरी होऊन म्हणाली, 'गडे, अग असें करूं नको. तुझ्यावांचून मी एकटी येथें कशी राहूं?'

हें ऐकून **इंदीवरिका** हंसून म्हणाली, 'आजच बाई-साहेब कांहीं गोष्ट बोलल्या होत्या त्यावरून लवकरच तुला माझ्यावांचून राहण्याचा प्रसंग येईल असें वाटतें.'

इंदीवरिकेचें वरील भाषण खुबीदार होतें. **आरण्यके**-ला राणीच्या हवालीं केली, त्यावेळीं ती लग्नाला योग्य झाली म्हणजे आपल्याला कळवावें असें **राजानें** सांगि-तलें होतें. त्याप्रमाणें **प्रियदर्शिका** बरीच प्रौढ होऊन, ती गायन, नृत्य इत्यादि कलांत विशेष प्रवीण झाली होती. तेव्हां आतां तिचें लवकर लग्न करून टाकावें, असें राणीच्या मनांत आलें होतें. व त्याप्रमाणें ती तिच्या लग्नाच्या संबंधानें कांहीं गोष्टी बोलली होती, त्यावरून **इंदीवरिकेनें** तसें भाषण केलें. तें ऐकून **आरण्यकेला** भलतेंच कांहीं वाटलें. ती दुःखित होऊन म्हणाली, 'अग, बाईसाहेब काय म्हणत होत्या तें एक-दाचें सांग तरी; मला ऐकूं दे.'

**इंदीवरिका** म्हणाली, 'अग, अशी घाबरलीस कां? त्यांत दुसरें कांहीं नाहीं. बाईसाहेबांनीं इतकेंच म्ह-टलें कीं, तूं आतां लग्नाला योग्य झाली आहेस, तेव्हां महाराजांला त्याबद्दल सूचना करावी, म्हणजे ते योग्य वराची योजना करण्याचा विचार करतील.'

**इंदीवरिकेचें** हें भाषण ऐकून **राजाची** शंका निवृत्त

झाली. हावेळपर्यंत ही कोण असावी, याची त्याला शंका होती. इंदीवरिकेचें बोलणें ऐकून तो हर्षानें म्हणाला, 'गड्या, समजलास का! ही त्या विंध्यकेतूची मुलगी. अरेरे! पण काय हा वेडेपणा. आम्ही इतके दिवस अगदीं फसलों. मित्रा, ह्या सुंदर मुलीकडे खुशाल पहा. तसें करण्यांत कांहीं दोष नाहीं. मला वाटतें, आतां आपण स्वस्थपणें हिला पाहून घेऊं या.'

इंदीवरिकेनें, राणी वराची योजना करण्याची राजाला सूचना करणार, असें सांगितलें, तें ऐकून रागानें कानावर हात ठेवून आरण्यका म्हणाली, 'तर मग तूं आतां जा. तूं असें भलतें भलतें बोलतेस तेव्हां मला तुझी सोबतच नको. आजपासून तुझी आमची गडी तुटली असें समज.'

हें ऐकून इंदीवरिका रागावून मागें फिरली, आणि निर्गुंडीचीं फुलें वेचूं लागली. तिला पाहून राजा म्हणाला, 'ह्या मुलीनें इंदीवरिकेवर राग केला याच्या योगानें आपला कुलीनपणा अगदीं व्यक्त केला आहे. एखादी हलक्या कुलांतली मुलगी असती, तर इंदीवरिकेचें बोलणें ऐकून तिला आनंद झाला असता. पण हिनें आपला धीरपणा दाखवून त्या दासीचा धिक्कार केला, हें खरोखरच हिच्या कुलीनपणाचें मुख्य लक्षण आहे. खरोखर त्या पुरुषाला धन्यच म्हटलें पाहिजे कीं, जो हिच्या अंगाला स्पर्श करून आपल्याला सुखोपभोगाला पात्र करून घेईल!'

इकडे आरण्यका कमळें काढीत होती, तिला पाहून वसंतक म्हणाला, 'मित्रा, पहा पहा! हें मोठेंच आश्चर्य!

ही लीलेनें हालणाऱ्या आपल्या सुंदर हातानें कमलव-
नाला देखील निस्तेज करून टाकीत आहे.'

राजा ह्मणाला, 'गड्या, खरोखरच तसें आहे. एक-
सारखी जणूं काय अमृताची वृष्टिच व्हावी त्याप्रमाणें
दृष्टीला प्रीति देणारी, व अंगावरचा पदर खालीं
पडल्यामुळें अवर्णनीय सौंदर्याला प्राप्त झालेली,
अशी प्रत्यक्ष चंद्राच्या तनूसारखी हिची तनु असून
चंद्रकिरणासारखे हिचे हात कमळांला लागले
असतांही, अद्याप तीं मिटलीं नाहींत हेंच मोठें आश्चर्य!'

आरण्यका कमळें तोडीत होती, इतक्यांत एक भ्रमर
तिच्या भोंवतीं घिरट्या घालून फार त्रास देऊं लागला.
त्याला उद्देशून ती म्हणाली, 'अरेरे! हे मेले भोंगे दुसऱ्या
कमलिनी सोडून येथेंच एकसारखे घिरट्या घालतात, या-
मुळें यांना वारतां वारतां माझा जीव दमला.'

वरचेवर वारलें तरी ते सोडीत नाहींत असें पाहून
आरण्यकेनें पदरानें आपलें तोंड झांकून घेतलें. आणि
इंदीवरिकेला हांक मारून म्हणाली, 'अग इंदीवरिके,
अग लवकर धांव. हे दुष्ट भ्रमर मला फारच त्रास देताहेत.
गडे माझें रक्षण कर.'

आरण्यकेला पाहतांच वत्सराज अगदीं मोहित झाला
होता, व ती विंध्यकेतूची मुलगी हें समजल्यावर तर
तिच्यावर झडप घालण्याचा त्यानें निश्चयच केला होता.
तथापि एकदम आपण पुढें कसें जावें, म्हणून तो कांहीं
तरी निमित्त पहात होता. भ्रमराची बाधा हें त्याला
आयतेंच निमित्त मिळालें. आरण्यकेनें इंदीवरिकेला हांक
मारली, तें ऐकून वसंतक राजाला म्हणाला, 'मित्रा, तुझ

मनोरथ पूर्ण झाले. ती बटकीची **इंदीवरिका** इकडे आली नाहीं, तोंपर्यंत तूं मुकाट्यानें हिच्याजवळ जा. म्हणजे ती पाण्यांत पावलें टाकल्याचा आवाज ऐकून—**इंदीवरि-काच** आपल्या जवळ आली असें समजून, तुला मिठी मारील.'

**वसंतकाची** ही युक्ति **राजालाही** पसंत पडली. तो म्हणाला, 'शाबास! वेळेवर चांगली गोष्ट सुचविलीस.' असें बोलून तो **आरण्यकेच्या** जवळ गेला.

**आरण्यका** यावेळीं तळींत होती. **राजा** तिच्या जवळ आला तेव्हां त्याच्या पावलांनीं झालेला पाण्याचा आवाज ऐकून खरोखरच **इंदीवरिका** आली असें समजून **आरण्यका** म्हणाली, 'अग **इंदीवरिके**, अगदीं हळू ये, नाहींतर हे मेले भ्रमर तुझ्यावर देखील झडप घालतील. मला तर यांनीं बाई अगदीं भंडावून सोडलें आहे.' असें बोलून जवळ आले-ल्या **राजाला इंदीवरिका** समजून **आरण्यकेनें** मिठी मारली!

**राजा** तिला आपल्या गळ्याशीं धरून तिच्या सभोंवतीं फिरणाऱ्या भ्रमरांला वारूं लागला. तेव्हां **आर-ण्यका** आपल्या तोंडावरचा पदर काढून, आपण कोणाला मिठी मारली आहे इकडे लक्ष्य न देतां, भ्रमरांकडेसच पाहूं लागली. **राजा** आपल्या शेल्यानें भ्रमरांला दूर घालवून तिला म्हणाला, 'अग भित्रे, आतां विषाद सोडून दे. हे भ्रमर तुझ्या मुखकमलाच्या रसाला लुब्ध होऊन त्यावर उड्या घालताहेत. असें असून तूं पुनः आपल्या मुखकमलाची शोभा चहूंकडे फेंकशील तर मग ते तुला कसे बरें सोडतील!'

हें ऐकून **आरण्यका** एकाएकीं **राजाकडे** पाहून भय-

भीत झाली, आणि—अरेरे! ही तर इंदीवरिका नव्हे, असें बोलून राजाला सोडून, अंमळ पलीकडे सरून, इंदीवरिकेला हाक मारून ह्मणाली, ‘अग इंदीवरिके, अग इंदीवरिके, अग लवकर ये, लवकर ये, आणि माझा बचाव कर.’

इतक्यांत वसंतक पुढें होऊन तिला म्हणाला, ‘अग बाई, सर्व पृथ्वीचें रक्षण करण्याला समर्थ अशा वत्सराजानें तुझें रक्षण केलें असून, त्या बटकीच्या इंदीवरिकेला हांका मारतेस हें काय!’

तूं विषाद सोड, म्हणून राजा तिला पुनः पुनः सांगूं लागला. आरण्यका, कांहींशी लज्जित होऊन आशापूर्वक राजाकडे पाहून आपल्याशींच म्हणाली, वत्सराज म्हणतात तो हाच असावा. आमच्या बाबांनीं ह्यालाच मला देऊं केलें होतें.

आरण्यका इंदीवरिकेला हांका मारीत होती. ती पहिल्या हांकेला तर आली नाहींच; पण वरचेवर तिनें हांका मारल्या त्या ऐकून म्हणाली, ‘अरेरे! ह्या दुष्ट मधुकरांनीं माझ्या आरण्यकेला फारच त्रास दिला असेल, व म्हणूनच ती एकसारखी ओरडत आहे. तर तिच्याजवळ जाऊन तिला भ्रमरांपासून सोडवून घ्यावी.’ असा विचार करून आरण्यकेला हाक मारून ह्मणाली, ‘अग आरण्यके, अग आरण्यके, भिऊं नको. ही पहा मी आलें.’

इंदीवरिका ही राणी वासवदत्तेची दासी असून तिच्या पक्षाची होती, म्हणून वसंतक घाबऱ्यां घाबऱ्यां राजाला म्हणाला, ‘मित्रा, एकीकडे हो, एकीकडे हो! ती पहा ती बटकीची पोर इंदीवरिका आली. कदाचित् ती पाहील तर राणी वासवदत्तेला हा वृत्तांत सांगितल्या–

वांचून राहणार नाहीं. याकरितां आपण ह्या जव-ळच्या कदलीगृहांत घटकाभर दडून बसूंया.' **वसंतकाचें** हें सांगणें **राजालाही** पसंत पडलें व त्याप्रमाणें दोघेहीं कदलीगृहांत दडून बसले.

इकडे **इंदीवरिका आरण्यके**च्या जवळ येऊन, तिच्या गालावरून हात फिरवून म्हणाली, 'अग **आरण्यके**, खरें म्हणशील तर कमलासारख्या दिसणाऱ्या ह्या तुझ्या तोंडाचाच हा अपराध आहे. भ्रमर झडप घालतात यांत त्यांचा कांहीं अपराध नाहीं. बरें असो. कमलें घेतलींस तेवढीं पुरेत. आतां संध्याकाळ होत आली, तर आपण लवकर बाईसाहेबांकडेसच जाऊंया.' असें बोलून तिचा हात धरून ती तिला घेऊन गेली.

**राजा** कदलीगृहांत दडाला होता हें **आरण्यकेनें** पाहिलेंच होतें. म्हणून ती त्या गृहाकडे दृष्टि लावून पाहूं लागली, आणि **इंदीवरिकेला** म्हणाली, 'अग, पाणी फारच थंड असल्यामुळें माझें अंग कसें गार झालें आहे, व त्यामुळें थोडेंसें कांपरें देखील सुटलें आहे, तर अंमळ हळु हळू चाल.' हें ऐकून **इंदीवरिका** हळुहळू चालूं लागली. व **आरण्यका** वरचेवर कदलीगृहाकडे पहात पहात जात होती.

याप्रमाणें दोघीही **वासवदत्ते**कडे निघून गेल्या, तेव्हां **राजा** आणि **वसंतक** कदलीगृहांतून बाहेर आले. **वसंतक राजाला** म्हणाला, 'ती बटकीची **इंदीवरिका** एकदांची गेली, आतां आपण खुशाल हिकडे तिकडे फिरूंया.'

**वसंतक** असें म्हणाला; पण आमच्या रंगेल्या **राजाची**

स्थिति यावेळीं कांहीं निराळीच झाली होती. त्याला सुंदर सुंदर बायकांचें फार वेड होतें, यामुळें **प्रियदर्शिके**ला आपण भेटलों असून मनोरथ पूर्ण करून घेतल्यावांचून उभयतांचा वियोग झाला, हें त्याच्या मनाला फार लागलें. तो सुस्कारा सोडून म्हणाला, 'गड्या **वसंतका**, काय रे सांगावें! एकून ती गेलीच. दुर्दैवी मनुष्याचे मनोरथ विघ्न आल्यावांचून कधींही पूर्ण होत नाहींत!'

तळींतील कमलांकडे पाहून म्हणाला, 'गड्या, असा हिकडे पहा तर खरा! हीं कमळें यावेळीं मिटलीं आहेत, तरी त्यांच्या अंगावर कांटा उभा राहिला आहे. यामुळें जणुं काय त्या **आरण्यके**च्या सुकुमार करपल्लवाचा स्पर्श होऊन आपण सुखी झालों, असेंच हीं दाखवीत आहेत.' पुनः श्वास सोडून म्हणाला, 'गड्या, **वसंतका**, आतां पुनः ती **दृष्टी** पडण्यास काय उपाय करावा बरें?'

**वसंतक** म्हणाला, 'तूं तरी एक मोठा विलक्षणच आहेस. बाहुली मोडून टाकावी आणि मग रडावें, त्यासारखें तूं केलेंस. मी आपला वेडा खुळा ब्राह्मण तुला कांहीं सांगत होतों; पण तें माझें सांगणें ऐकलेंस नाहीं, म्हणून असें झालें.'

**राजा** ह्मणाला, 'अरे मीं असें काय केलें? तुझें सांगणें ऐकलें नाहीं म्हणतोस, तें काय ऐकिलें नाहीं तें सांग पाहूं.' **वसंतक** म्हणाला, हेंच पहा. मीं काय सांगितलें त्याची तुला आठवण देखील नाहीं. तुला मीं सांगितलें होतें कीं, अगदीं मुकाट्यानें तिच्या जवळ जा म्हणून. ती त्यावेळीं मोठ्या संकटांत पडली असून तूं, 'विषाद सोड, तुझ्या मुखकमलाच्या रसाला हे भ्रमर लुब्ध झाले आहेत, अशा प्रकारचें खोटें पांडित्य करून तिला

आपली रसिकता दाखवूं लागलास. तेव्हां त्या तसल्या कडू भाषणानें रागावून ती निघून गेली. मग आतां कां रडतोस ? आणि पुनः उपाय तरी कशाला विचारतोस ?'

**वसंतकाचें** हें भाषण ऐकून **राजाला** खरोखरच मोठें आश्चर्य वाटलें. **राजानें आरण्यकेला** राग येण्यासारखें कांहींच भाषण केलें नसून उलट तिचें समाधान केलें होतें. असें असून **वसंतकानें** त्याबद्दल त्याला दोष दिला; ह्मणून **राजा** ह्मणाला, 'अरे मूर्खा! मी तिची समजूत केली त्याला देखील तूं, तिची हेटाळणी केली, असें कसें ह्मणतोस ? '

**वसंतक** ह्मणाला, 'पुरे पुरे ! येथें मूर्ख कोण आहेत, तें आतां उघडच झालें आहे. बरें पण, ह्या गोष्टी बोलून काय उपयोग? व्हायचें ते होऊन गेलें. सूर्य अस्ताला जात आहे, तर चल आपण आतां अंतःपुरांतच जाऊं या. राणीनें व्रताची सांगता केली असेल व ती तुझ्या दर्शनाविषयीं उत्कंठित झाली असेल; तर येथें उगीच खोटे मनोरथ करीत बसण्यापेक्षां, राणीला भेटून तिचें समाधान कर, व मलाही गरीब ब्राह्मणाला वाण देवव ह्मणजे झालें. '

**राजा** सूर्याकडे पाहून ह्मणाला, 'गड्या, खरेंच दिवस अगदीं सरलाच ह्मणायचा. सांप्रत कमलवनाच्या शोभेला हरण करून माझ्या प्रियतमेप्रमाणें ( **आरण्यकेप्रमाणें** ) ही दिनश्री निघून गेली. ह्या सूर्यमंडलाच्या ठिकाणीं माझ्या मनाप्रमाणें राग ( प्रेम व लाली ) अधिक दिसतो. चक्रवाक पक्ष्याप्रमाणें मी ह्या तळीच्या कांठीं प्रियेचें ध्यान करीत बसलों आहें, व प्रिया

गेल्यामुळें जसा मला चहूंकडे अंधकार वाटतो, तशा ह्या दशदिशाही अंधकारानें व्यापल्या आहेत! असो. आतां आपण राणीकडेसच जाऊं या.'

राजा वसंतकासह, धारागृहोद्यानांत राणी व्रताची सांगता करीत होती, तेथें गेला. तों राणीचें व्रत समाप्त झालें होतें, व ती सुवासिनी स्त्रियांची पूजा करून शेवटचें कांहीं कृत्य करीत होती, इतक्यांत राजा तेथें गेल्यामुळें तिला फार आनंद झाला. वसंतकाची अंमळ थट्टा करून त्याला तिनें वाण दिलें, व नियमांतून मोकळी होऊन राजाला भेटली. फार वेळ परस्परांला समागमाचा लाभ झाला नव्हता, ह्मणून उत्कंठित झालेल्या त्या प्रेमळ दंपत्यानें आपले मनोरथ पूर्ण करून घेतले.

---

## भाग तिसरा.

वासवदत्तेजवळ, तिला वरचेवर बुद्धिवाद सांगणारी, मोठी पोक्त असून शास्त्रादिकांत परम निपुण, अशी सांकृत्यायनी नांवाची एक विदुषी बाई होती. ही, आजन्मपर्यंत अविवाहित राहण्याचा संकल्प करून, ब्रह्मचर्यानें वागत होती. प्रथम वासवदत्तेची आई अंगारवती हिच्या जवळ ती फार दिवस राहिली होती, व तेथेंच वासवदत्तेचा अगदीं लहानपणापासून तिच्याकडे लळा होता. वत्सराज वासवदत्तेला घेऊन आला, त्यानंतर वासवदत्तेनें आपल्या आईला वरचेवर सांगून पाठवून मोठ्या आग्रहानें सांकृत्यायनीला आपल्या जवळ आणून ठेवली. मुलगी आणि जांवई दोघेंही

तरुण आहेत, तेव्हां वेळीं दोन गोष्टी समजून सांगण्याला कोणीतरी पोक्त मनुष्य जवळ असावें, ह्मणून **अंगारवतीला**, **सांकृत्यायनीचा** वियोग सहन होत नव्हता तरी, तिला तिनें **वासवदत्तेकडे** पाठविलें.

**वत्सराज** व **वासवदत्ता** हीं उभयतां मोठीं दैवशाली होतीं. त्यांना कोणत्याही गोष्टीची काळजी ह्मणून कसली ती मुळींच माहीत नव्हती. संपत्ति वगैरे सर्व गोष्टींची अनुकूलता असल्यामुळें उभयतांनीं नाना प्रकारचे विलास, हास्य, विनोद करून मोठ्या आनंदांत काळ घालवीत असावा. दररोज कांहींतरी नव्या नव्या करमणुकीच्या गोष्टी निघतच असत.

**सांकृत्यायनी** ही मोठी विदुषी होती हें वर सांगितलेंच आहे. तिनें, **वत्सराजानें वासवदत्तेचें** हरण केलें, या गोष्टीचें संविधानक कल्पून, त्यावर एक सुंदर नाटक रचून, राणी **वासवदत्तेला** व **वत्सराजाला** अर्पण केलें. त्या उभयतांला तें फारच पसंत पडल्यावरून त्यांनीं त्याचा प्रयोग करून पहावा, ह्मणून संगीतशालेंत शिकलेल्या तरुण तरुण स्त्रियांला तें नाटक शिकवून तयार करविलें. राणीच्या सांगण्यावरून कांहीं उत्सवाच्या निमित्तानें गेल्या रात्रीं त्या नाटकाच्या पूर्वार्धाचा प्रयोग केला होता, व उत्तरार्धाचा प्रयोग करायाचें राहिलें होतें. त्या नाटकांत **आरण्यका** ही **वासवदत्तेचें** सोंग घेत होती, व **मनोरमा** नांवाची दुसरी एक तिचीच परम मैत्रीण **वत्सराजाचें** सोंग घेत होती.

मागच्या भागांत **राजाची** व **आरण्यकेची** भेट होऊन **राजाचें** मन तिच्यावर आसक्त झालें होतें, हें

सांगितलेंच आहे. जसें **राजाचें** मन तिच्यावर बसलें होतें, तसें तिचेंही मन **राजावर** अतिशय आसक्त झालें होतें. **राजाची** भेट झाल्या दिवसापासून तिची स्थिति कांहीं चमत्कारिकच झाली होती. **सांकृत्यायनीनें** केलेल्या नाटकाच्या पूर्वार्धाचा प्रयोग झाला, त्या दिवशीं तिनें बरीच धांदल केली. तिचें चित्त ठिकाणावर नसल्यामुळें आपल्या सोंगाचें काम करतेवेळीं, तिचे वरच्यावर संचार जाऊं लागले. वस्तुतः असें होण्याचें कारण निराळेंच होतें, तरी राणी **वासवदत्ता** सरळ स्वभावाची असल्यामुळें तिनें, तिची प्रकृति नीट नाहीं ह्मणून तसें झालें, असें मानलें.

**आरण्यका** बरींच वर्षें **वासवदत्तेजवळ** राहिली होती. राजवाड्यांतील इतर पाळलेल्या मुली व दासी, यांच्याशीं तिचें नेहमीं संघट्टण होत असल्यामुळें तिचा पुष्कळांशीं विशेष परिचय झाला होता. तरी **मनोरमा** नांवाची एक पाळलेली मुलगी होती, तिच्याशीं **आरण्यकेची** फारच मैत्री जडली होती. दोघीही परस्परांला आपलें हितगुज सांगत असत.

**राजाची** भेट होऊन **आरण्यकेचें** त्याच्यावर मन बसलें, व त्यापासून तिची स्थिति कांहीं चमत्कारिक झाली, ही गोष्ट **मनोरमेला** मुळींच माहीत नव्हती. गेल्या रात्रीं जो नाटकाचा प्रयोग झाला, त्यांत **आरण्यकेचें** मन ठिकाणावर नव्हतें, असें **मनोरमेच्या** लक्षांत आलें. यद्यपि मनाची वृत्ति बिघडण्याला अनेक कारणें असतात, तथापि **आरण्यकेसारख्या** तरुण मुलींचें मन बिघडायचें, तें बहुतकरून कामदेवाच्या बाणप्रहारानेंच बिघडण्याचा

विशेष संभव असल्यामुळें, **मनोरमेच्या** मनांत त्याविषयीं संशय आला. तथापि तिचें मन कोणत्या पुरुषावर जडलें आहे, हें तिच्या मनांत आलें नव्हतें; ह्मणून ती **आरण्यकेला** भेटून तिचा हेतु समजून घेण्याचा प्रयत्न करीत होती. आज पुनः नाटकाचा प्रयोग व्हायचा आहे, तेव्हां कालच्या सारखाच हिच्या हातून प्रमाद न घडावा, ह्मणून तिला दोन गोष्टी सांगाव्या असेंही **मनोरमेच्या** मनांत होतें.

ती **आरण्यकेचा** शोध करायाला निघाली असून आपल्याशींच ह्मणाली, आज मला **वासवदत्ता** राणीसाहेबांनीं हुकूम केला आहे कीं, भगवति **सांकृत्यायनीनें** आर्यपुत्राचा आणि माझा जो वृत्तांत नाटकरूपानें लिहिला आहे, त्यांतल्या बाकी राहिलेल्या कथाभागाचा आज तुह्मी प्रयोग करा. काल माझी प्रियसखी **आरण्यका** हिचें मन ठिकाणावर नव्हतें, ह्मणून तिनें भलत्याच प्रकारचा अभिनय केला. आज पुनः तिला **वासवदत्तेचें** सोंग घ्यावयाचें आहे. आणि आज तिच्या हातून वेडेंवांकडें कांहीं झालें, तर बाईसाहेब खरोखरच रागावतील. तेव्हां कालच्या चुकीबद्दल तिची चांगली कानउघडणी करून, आज तरी आपल्या सोंगाचें काम नीट रीतीनें करण्यास सांगितलें पाहिजे. पण ती यावेळीं कोठें आहे कोणास ठाऊक? तिला भेटून तिची चांगली खरड काढली पाहिजे.

**आरण्यकेला** यावेळीं विशेष कांहीं काम नव्हतें. तिला चैन पडेना, ह्मणून ती **धारागृहोद्यानांतील** तळीच्या कांठीं पुष्कळ वेळ बसून नुकतीच कदलीगृहांत जाण्यास निघाली होती. इतक्यांत **मनोरमेची** तिच्यावर दृष्टि

गेली. तेव्हां **मनोरमा** आपल्याशींच ह्मणाली, यावेळीं ही फार चांगली संधी आहे. हीं **आरण्यका** आपल्याशींच कांहीं बोलत आहे, तेव्हां ह्या मोगरीच्या मंडपाच्या आड उभी राहून ही काय बोलते तें ऐकावें. असा विचार करून **मनोरमा** आड उभी राहिली.

इकडे **आरण्यका** कदलीगृहांत जाऊन तेथल्या एका आसनावर बसली, आणि मदनानें व्याकूळ होत्साती, सुस्कारा सोडून आपल्या मनाला उद्देशून ह्मणाली, 'मना, ज्याची कधीं भेट व्हायची नाहीं अशा मनुष्यावर आशा ठेवून तूं मला उगीच कां दुःख देतेंस !'

इकडे **मनोरमा** तिचें बोलणें ऐकत बसली होती. ती **आरण्यकेचे** वरील उद्गार ऐकून आपल्याशींच ह्मणाली, बरोबर. मी आधींच ताडलें होतें. हिचें मन ठिकाणावर नसण्याचें कारण काय तें हेंच. पण आतां ही कोणाची इच्छा करीत आहे, तें आपण येथेंच राहून ऐकावें.

इकडे **आरण्यका** डोळ्यांत अश्रु आणून ह्मणाली, 'महाराजांचें दर्शन अत्यंत सुखकारक असून, त्यापासून मलाच कां बरें संताप होत आहे ? खरोखर हें मोठेंच आश्चर्य. न जाणो कदाचित् माझें दैवच तसें असेल, ह्मणून मला दुःख होतें. त्यांत महाराजांचा काय दोष ?'

हें ऐकून **मनोरमेला** फारच आनंद झाला, व त्याच्या योगानें तिच्या डोळ्यांतून अश्रु निघाले. ती ह्मणाली, 'एकून महाराजांवरच हिचें मन बसलें आहे. खरोखर, हें फार चांगलें झालें. प्रियसखि **आरण्यके**, शाबास !

शाबास! तुझ्या सारख्या मोठ्या कुलीन मुलीला शोभेल असाच तुझा अभिलाष आहे.'

इकडे **आरण्यका** ह्मणाली, 'आतां हें दुःख कोणाला सांगावें? आपली हितकर्ती असेल तिला तें सांगितलें ह्मणजे त्याच्या वेदना अंमळ कमी होतील. पण इतका विचार कशाला पाहिजे? प्रत्यक्ष माझें मनच, अशी माझी प्रियसखी **मनोरमा** आहे, तिला सांगावें ह्मणजे झालें. पण काय करूं! लाजेनें तिच्याजवळ देखील माझ्यानें सांगवत नाहीं. कसें झालें तरी मरण आल्याशिवाय माझ्या हृदयाला सुख होण्याचें दुसरें साधन नाहीं!

हें ऐकून **मनोरमा** अतिशय दुःखित होऊन ह्मणाली, 'हाय हाय! ह्या बिचारीचा प्रियपुरुषानुराग मर्यादेच्या बाहेर गेला आहे, तेव्हां आतां येथें काय करावें?'

इकडे **आरण्यका** म्हणाली, 'तीच ही जागा, जेथें महाराजांनीं मला पाहिलें होतें, आणि भ्रमरांनीं मला फार त्रास दिला म्हणून मिठी मारून त्यांनीं—भित्रे, भिऊं नको, असें ह्मणून माझें समाधान केलें.'

वरचे उद्गार ऐकून **मनोरमेला**, राजाशीं तिची भेट करून देणें, फार अशक्य वाटलें होतें. पण आतांच्या भाषणांत राजाची भेट झाल्याचा उल्लेख आला, तो ऐकून **मनोरमा** हर्षानें ह्मणाली, 'एकूण महाराजांनीं हिला पाहिलें देखील. तेव्हां आतां हिचे प्राण वांचण्याचा कांहीं उपाय निघेल असें वाटतें. आतां आपण हिच्या जवळ जाऊन तिचें समाधान करावें,' असा विचार करून **मनोरमा** एकाएकीं **आरण्यकेच्या** जवळ

येऊन–‘ बरें बरें, आपल्या हृदयाशीं देखील लाजावें असें तुला वाटतें ना ?’ असें म्हणाली.

हे तिचे शब्द ऐकून **आरण्यके**ला फारच लाज वाटली. ती मनांत ह्मणाली, अरेरे ! एकंदरींत माझ्या सर्व गोष्टी हिनें ऐकल्या. तेव्हां आतां सर्व हकीकत हिला सांगावी हें बरें. **मनोरमे**चा हात धरून मोठ्या प्रेमानें ह्मणाली,‘गडे **मनोरमे**, अशी रागावूं नकोस. तूं कीं नांहीं माझें प्रत्यक्ष हृदय असून, मी हावेळपर्यंत तुला कळविलें नाहीं हा कांहीं माझा अपराध नाहीं. खरें ह्मणशील तर, हा लाजेचा अपराध आहे.’

हें ऐकून **मनोरमा** हर्षानें ह्मणाली, ‘ अग, शंका ठेवूं नकोस. मला आधीं हें सांग पाहूं. खरेंच का ग महाराजांनीं तुला पाहिलें ? ’

यावर **आरण्यका** खालीं मान घालून ह्मणाली, ‘ गडे, तूं तर सारें ऐकलेंस, आणि आतां मला काय विचारतेस ?-

**मनोरमा** ह्मणाली, ‘ अग, जर महाराजांनीं तुला पाहिलें असेल, तर आतां तूं संताप करण्याचें कांहीं कारण नाहीं. तेच, तुझ्या भेटीविषयीं कोणता उपाय करावा, त्याची तजवीज करतील.’

**आरण्यका** ह्मणाली, ‘ मैत्रिणी आपल्या सखीच्या पक्षपातानें बोलतात. अग पक्षपात करणारे गडे **मनोरमे**, बाईसाहेबांच्या गुणरूपी बेडीनें बांधलेल्या त्यांना ( राजाला ) माझी कोठून आठवण होणार ?’

हें ऐकून **मनोरमा** हंसून ह्मणाली, ‘ अग वेडे, कमलिनीवर पुष्कळ अनुराग असला, तरी मधुकर नुकत्याच फुललेल्या मोगरीला पाहून नूतन रसाची गोडी घेण्या-

विषयीं लंपट होतो, व तिची प्राप्ति झाल्यावांचून त्याला चैन पडत नाहीं, हें देखील तुला समजत नाहीं का ?'

**आरण्यका** ह्मणाली, 'अशा भलत्याच कल्पना करण्यांत काय अर्थ आहे ? चल, आपण जाऊं या. शरदृतूंतल्या कडक उन्हानें संतप्त झालेलें माझें अंग अद्याप निवत नाहीं.'

बस्तुतः **आरण्यका** यावेळीं कामाग्नीनेंच संतप्त झाली होती; पण तिनें कामाचें नांव न घेतां शरदृतूंतल्या उन्हाचें नांव घेतलें. तें ऐकून **मनोरमा** ह्मणाली, 'अग, तूं किती तरी लाजाळू आहेस, कोणास ठाऊक? अशी अवस्था झाली असूनही तूं अद्यापि आपली खरी स्थिति चोरतेस, हें कांहीं चांगलें नव्हे.'

हें ऐकून **आरण्यका** खालीं मान घालून बसली. तिनें **मनोरमेला** मुळींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां **मनोरमा** पुनः ह्मणाली, 'अग विश्वास न ठेवणारे मडे **आरण्यके**, माझ्याजवळ आतां उगीच कां चोरतेस ? वरचेवर तूं सुस्कारे सोडीत आहेस, त्यांच्या द्वारानें बाहेर निघालेला तुझा अनुराग, रात्रंदिवस वारंवार तुझ्या अंगावर पडणाऱ्या मदनाच्या बाणांच्या शब्दासारखा, आपोआप प्रगट होत आहे.'

**आरण्यका** फारच व्याकूळ झाली आहे असें पाहून **मनोरमा** आपल्याशींच ह्मणाली, यावेळीं हिची थट्टा करणें चांगलें नाहीं. हिला मदनज्वरानें अगदीं व्याकुल केलें आहे. तर कमलिनीचीं पानें हिच्या अंगावर घालावीं, ह्मणजे हिला अंमळ बरें वाटेल. असा विचार करून **मनोरमेनें** तळींतलीं कमलिनीचीं पानें आणून आर-

ण्यकेच्या अंगावर कातली, आणि, 'सखि आरण्यके, ह्या गार कमलिनींच्या पानांनीं तरी तुझें अंग शीतल होवो!' असें ह्मणाली.

ज्याप्रमाणें इकडे आरण्यका मदनबाधेनें पीडित झाली, त्याचप्रमाणें तिकडे वत्सराजही अतिशय व्याकुळ झाला होता. जशी मनोरमा, आरण्यकेचें दुःख कोणत्या रीतीनें दूर करावें, याविषयीं विचार करीत होती, तसाच तिकडे वसंतक, राजाचें दुःख कसें दूर करावें, याचा विचार करीत होता. राजाला रात्रंदिवस आरण्यकेचें ध्यान लागलें होतें. तेव्हां कांहीं करमणुकीचे उपाय करून कसें तरी त्याच्या मनाचें समाधान करीत. वसंतक सारा वेळ त्याच्याजवळच बसला होता; पण राजानें एकसारखा आरण्यकेचा ध्यास घेतल्यामुळें वसंतकाच्या प्रयत्नांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं राजानें तिचा समाचार आणण्याविषयीं आग्रहपूर्वक सांगितल्यावरून वसंतक आरण्यकेकडे निघाला.

तो आपल्याशींच ह्मणाला, प्रियमित्राचा त्या आरण्यकेवर फारच अनुराग आहे यांत कांहीं संशय नाहीं. तिचें दर्शन झाल्यापासून राजकार्यें वगैरे वगैरे सोडून देऊन, रात्रंदिवस तो तिच्याच भेटीचा उपाय योजीत बसून आपल्या मनाची करमणूक करून घेतो. एकंदरींत, कांहींतरी युक्ति काढून राजाची तिच्याशीं भेट करून दिली पाहिजे, त्यावांचून परिणाम नाहीं. याकरितां आपण राजाच्या सांगण्याप्रमाणें आधीं त्या आरण्यकेची भेट घ्यावी, असा विचार करून, तो प्रथम वासवदत्तेच्या, नंतर पद्मावतीच्या व त्यानंतर रत्नावली

इत्यादि इतर राण्यांच्या महालांत जाऊन, त्यानें तिचा शोध केला. पण आरण्यका तेथें कोठेंच भेटली नाहीं. तेव्हां जातां जातां, त्या तळीवर कदाचित् बसली असेल तर तेथें पहावें, ह्मणून तो तिकडे गेला. त्याच्या पावलांचा आवाज ऐकून मनोरमा ह्मणाली, 'अग, कोणाचींशीं पावलें वाजताहेत. तेव्हां आपण ह्या केळीच्या बेटांत दडून बसून कोण येत आहे तें पाहूं या.'

नंतर आरण्यका आणि मनोरमा दोघीही केळीच्या बेटांत दडून बसल्या. इतक्यांत वसंतक त्यांच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून आरण्यका ह्मणाली, 'अग, हा तर महाराजांचा प्रियगडी ब्राह्मण आहे. याला भिऊन दडायला नको.'

मनोरमा ह्मणाली, 'हो हो. हा तो वसंतकच.' मनांत ह्मणाली, देवा! खरोखर हा हिलाच शोधायला आला असें होईल का?

इकडे वसंतक चहूंकडे पाहून ह्मणाला, 'खरोखरच ती आरण्यका येथें असेल का?'

हें ऐकून मनोरमा हसून आरण्यकेला ह्मणाली, 'अग, हा राजाचा सोबती ब्राह्मण तुझ्याच उद्देशानें कांहीं बोलत आहे. तर आपण येथंच उभ्या राहून ऐकूं या.'

इकडे वसंतक उद्विग्न होऊन ह्मणाला, 'मदनाच्या पीडेनें अत्यंत अस्वस्थ झालेल्या प्रियमित्राच्या मागण्यावरून मी, राणी वासवदत्ता आणि पद्मावती, तशीच रत्नावली, इत्यादि इतर राजस्त्रियांच्या महालांत जाऊन शोध केला. पण ती तेथं कोठें दिसली नाहीं. आतां ह्या तळीवर तिचा शोध करायचा राहिला आहे,

तो करावा ह्मणून मी येथें आलों. पण येथें देखील ती कोठें दिसत नाहीं. तेव्हां आतां काय करावें ?'

हें ऐकून **मनोरमा आरण्यके**ला ह्मणाली, 'प्रियमैत्रिणी, हा काय बोलला तें तूं ऐकलेंस ना ?'

इकडे **वसंतक** अंमळ विचार करून पुनः ह्मणाला, 'मला माझ्या मित्रानें सांगितलेंच आहे कीं, जर ती तुला कोठें न दिसेल तर, तूं त्या तळीवर जा, आणि तेथें तिच्या करकमलस्पर्शानें दुप्पट शीतळ झालेली तेथील कमलिनींचीं पानें घेऊन ये; पण हें देखील मोठें कठीणच आहे. कारण, त्या **आरण्यके**नें कोणकोणत्या कमलिनीला हात लावला होता, तें मला कसें समजावें ?'

हें ऐकून, हीच आपल्याला उत्तम संधि आहे असें जाणून, **मनोरमा वसंतका**जवळ गेली, आणि त्याचा हात धरून म्हणाली, 'आर्या **वसंतका**, असा हिकडे ये. महाराजांनीं ज्या कमलिनीचीं पानें तुला आणावयाला सांगितलीं आहेत, ती कोणती कमलिनी, हें मी तुला दाखवितें.'

**मनोरमा** ही **वासवदत्ते**ची दासी असून ती तिच्या पक्षाची. ती **आरण्यके**ची प्रियमैत्रीण असून तिचें प्रिय करण्याविषयीं झटणारी आहे, हें **वसंतका**ला मुळींच ठाऊक नव्हतें. **मनोरमेनें** एकाएकीं—मी कमलिनी दाखवितें, असें सांगितलें, तेव्हां तो घाबरा होऊन म्हणाला, 'तूं कोणाला दाखवितेस ? आणि काय दाखवितेस ? राणी **वासवदत्ते**ला कांहीं दाखवायचें आहे का ? आणि मी तरी काय म्हटलें ?'

हें ऐकून **मनोरमे**ला त्याच्या घाबरेपणाचें हंसूं आलें.

ती म्हणाली, 'अरे, अशी शंका कां घेतोस ? जशी ह्या आरण्यकेकरितां तुझे प्रियमित्र महाराज यांची अवस्था झाली असल्याचें तूं वर्णन केलेंस, त्याच्या दुप्पट महाराजांकरितांही, माझी प्रियसखी **आरण्यका**, हिची अवस्था झाली आहे. पाहिजे असेल तर प्रत्यक्ष पहा.' असें सांगून **मनोरमेनें आरण्यकेची** स्थिति त्याला दाखविली.

ती पाहून **वसंतकाला** मोठा हर्ष झाला, व त्यानें राजाची स्थिति वर्णन केली, ती ऐकून **मनोरमेला** आनंद झाला. कारण स्त्रीपुरुषांचा समागम हा मोठा चमत्कारिक आहे. जसा पुरुष स्त्रीवर आसक्त असेल तशी स्त्रीही त्याच्यावर आसक्त असली, तर साऱ्या गोष्टी. नाहींपेक्षां त्यांत कांहीं अर्थ नाहीं. **वसंतक** आणि **मनोरमा** हीं दोघेंही आपापल्या मित्रांचा हेतु पूर्ण करण्याविषयीं झटत होतीं. जसा **राजा** तिच्याकरितां व्याकुळ झाला आहे, तशी **आरण्यकाही** त्याच्याकरितां व्याकुळ झाली आहे, हें पाहून त्याला समाधान वाटलें; व आपल्या प्रियसखीप्रमाणें **राजाही** तिच्याविषयीं दुःख करीत आहे, हें ऐकून **मनोरमेला** समाधान वाटलें.

**आरण्यका** यावेळीं कमलिनीचीं पानें अंगावर घेऊन त्या कदलीगृहांत पडली होती, तिला पाहून **वसंतक** म्हणाला, 'माझा श्रम सफल झाला. बाई **आरण्यके**, तुझें कल्याण असो !'

**वसंतकाचें** हें भाषण ऐकून **आरण्यका** लाजून चटकन् उठून बसली. तिनें आपल्या अंगावरचीं कमलिनीचीं पानें एकीकडे केलीं, तें पाहून **मनोरमा वसंतकाला** म्ह-

णाली, 'आर्या वसंतका, हें पहा काय तें. तुझ्या दर्शनानेंच हिचा संताप दूर झाला, ह्मणूनच हीं वमलिनींचीं पानें ही आपल्या हातानें काढून टाकते आहे. तर आतां तूं हीं पानें घेऊन जा. तुझ्या मित्रानें तुला हींच पानें आणायला सांगितलीं होतींना? तीं आपलीं घेऊन जा कशीं.'

हें ऐकून आरण्यका, तीं कमळाचीं पानें दाबून धरून, रागानें मनोरमेला ह्मणाली, 'पुरे बाई! किती तरी थट्टा करशील! उगीच कांहींतरी बोलून मला कां हिणवितेस कोणास ठाऊक?'

हें ऐकून वसंतक अंमळ विरस होऊन ह्मणाला, 'अग मनोरमे, बाई तीं तुझीं कमळाचीं पानें असूंदेत एकीकडे. अग पण ही तुझी मैत्रीण फारच लाजाळू आहे असें वाटतें. तेव्हां राजाशीं हिचा समागम कसा होईल याची मला मोठी काळजी पडली आहे.'

आरण्यकेचा राजाशीं कसा समागम करून द्यावा, याविषयीं मनोरमेनें आधींच योजून ठेविलें होतें. आज नाटक करण्याचा प्रसंग आहेच. तेव्हां नाटकांत वासवदत्तेचें सोंग घेऊन आरण्यका आली, ह्मणजे त्यावेळीं, आपण राजानें सोंग घ्यायचें तें न घेतां युक्तीनें प्रत्यक्ष राजालाच रंगभूमीवर आणावा, व तेथें परस्परांचा समागम करून द्यावा, अशी तिनें मनांत योजना केली होती. ती वसंतकाला ह्मणाली, 'ह्या उभयतांचा समागम कसा होईल, याविषयीं तूं कांहीं काळजी करूं नकोस. याविषयीं मीं काय योजना केली आहे ती तुला सांग-

तें.' असें बोलून तिनें **वसंतकाच्या** कानांत, पुढें काय करावयाचें तें सांगितलें.

तें ऐकून **वसंतक** खुष होऊन ह्मणाला, 'शाबास, प्रियसखे **मनोरमे**! तूं मोठी शहाणी आहेस खरी.' **आरण्यकेला** न कळत ह्मणाला, 'अग **मनोरमे**, तर मग आतां संध्याकाळ होत आली आहे. जेवणखाण आटोपलें ह्मणजे नाटकाची सुरवात होणार, तेव्हां तुझी ही योजना मी **राजाला** कळवितों, आणि तुम्ही सोंग घेण्याची तयारी कराल, त्यावेळीं **राजा** नेमका तेथें येईल अशी तजवीज करतों.' असें सांगून **वसंतक राजा**कडे निघून गेला.

**आरण्यका** फुगून बसली होती, तिचें समाधान करून **मनोरमा** ह्मणाली, 'अग किती तरी बाई रागीट स्वभाव तुझा! प्रियसखे, ऊठ, ऊठ; काल जें नाटक केलें होतें, त्याच नाटकाच्या पुढच्या भागाचा आज प्रयोग करावयाचा आहे, तर चल लवकर आपण बाकीचें काम आटपून संगीतशाळेंतच जाऊंया,' असें सांगून **मनोरमा आरण्यकेचा** हात धरून तिला घेऊन गेली.

रात्रीचें जेवणखाण वगैरे आटोपल्यावर **मनोरमा आरण्यकेला** बरोबर घेऊन नाट्यशाळेंत गेली. तेथें आज नाटक व्हायचें ह्मणून आधींच सर्व तयारी केलेली होती. ती पाहून **मनोरमा** ह्मणाली, 'वाहवा! सर्व तयारी तर झाली आहे. आतां बाईसाहेब येण्याचाच काय तो अवकाश, ह्मणजे लगेच नाटकाला सुरवात होईल; तोंपर्यंत आपणही आपली तयारी करूं या.'

इतक्यांत राणी **वासवदत्ता, सांकृत्यायनी** व इतर

दासदासी इत्यादिकांसहवर्तमान तेथें आली. चहूंकडे कडेकोट तयारी झालेली पाहून **वासवदत्ता सांकृत्यायनी**ला ह्मणाली, 'भगवति, तुमचें कवित्व तरी मोठें वर्णनीय आहे! वस्तुतः आजच्या नाटकांतलें संविधानक ह्मणजे कांहीं अपूर्व गोष्ट आहे, असें नाहीं. मला आणि आर्यपुत्राला त्याचा प्रत्यक्ष अनुभवच घडलेला आहे. तरी तुमच्या चमत्कारिक रचनेनें तें अगदीं अपूर्व आहे असें वाटतें, व पाहण्याविषयीं अधिक कौतुक उत्पन्न होतें. हा सर्व तुमच्या कवित्वाचा प्रभाव आहे.'

**सांकृत्यायनी** ह्मणाली, 'मुली **वासवदत्ते**, तूं ह्मणतेस तसें कांहीं नाहीं. मोठ्यांच्या आश्रयाचा असाच गुण असतो. अगदीं निरस काव्य असलें तरी नायक आणि नायिका यांच्या मोठेपणावर तें लोकांला आनंदकारक वाटतें. असें पहा कीं, कोणतीही वस्तु असो, ती मोठ्याच्या आश्रयानें महत्वाला पावते. राख हा पदार्थ अगदीं तुच्छ आहे, तरी मदोन्मत्त हत्तींच्या गंडस्थलावर असलेली तीच राख अलंकारभूत होते. तेव्हां एकंदरींत महदाश्रयाचा हा प्रभाव आहे.'

**सांकृत्यायनी** ही, **वासवदत्तेची** आई **अंगारवती**, हिची परम मैत्रीण होती. तेव्हां अर्थात् तिकडच्या संबंधावरून **वत्सराज** हा **अंगारवती**प्रमाणें तिचाही जांवई ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. हें नातें मनांत आणून **वासवदत्ता** हंसून म्हणाली, 'भगवति, सर्वांला जांवई म्हटला म्हणजे तो अत्यंत प्रिय असतो, ही गोष्ट प्रसिद्धच आहे; म्हणून तुम्ही आपल्या जांवयाची तारीफ करतां. असो.

ह्या गोष्टी आतां कशाला पाहिजेत ? नाटकाला लवकर प्रारंभ होऊंद्या म्हणजे झालें.'

हें ऐकून **सांकृत्यायनी** म्हणाली, 'बरें, तसेंच होऊं दे.' नाटकशाळेंतली तयारी पाहून **सांकृत्यायनी** म्हणाली, 'ज्यामध्यें शेंकडों रत्नें खचलीं आहेत असे अनेक सोन्याचे खांब रमणीय दिसत असून त्यांच्यावर मोत्यांचे घोंस लोंबत आहेत. सौंदर्यादि गुणांनीं प्रत्यक्ष अप्सरांला देखील मागें सारणाऱ्या अशा अनेक स्त्रिया जेथें बसल्या आहेत, असें हें प्रेक्षागृह ( नाटकगृह ) फारच सुंदर दिसतें. याला देवाच्या विमानांचीच उपमा दिली तर साजेल!'

**वासवदत्ता** आली हें पाहून **मनोरमा** आणि **आरण्यका** या दोघींनीं तिला आणि **सांकृत्यायनी**ला नमस्कार केले. **मनोरमेनें वसंतकाशीं** काय मसलत केली होती ती **वासवदत्ते**ला मुळींच ठाऊक नव्हती. ती म्हणाली, 'अग **मनोरमे**, किती वेळ झाला ? अजून तुम्ही तयार झाला नाहीं, हें काय? जा जा लवकर. यथायोग्य सोंगें घेऊन या, आणि नाटकाला प्रारंभ होऊंद्या. प्रेक्षक मंडळी बहुतकरून सर्व आली आहे.'

हें ऐकून **मनोरमा** आणि **आरण्यका**, हुकुमाप्रमाणें करतों, असें सांगून परत जात होत्या, तों राणी **आरण्यके**ला हांक मारून म्हणाली, 'अग **आरण्यके**, हिकडे य. माझा वेष तुलाच घ्यायचा आहे. आतां जनानखान्यांत जाऊन दागिने वगैरे आणीपर्यंत पुष्कळ वेळ लागेल. याकरितां हे माझ्या अंगावर दागिने आहेत, तेच घे म्हणजे झालें.' असें सांगून

राणीनें आपल्या अंगावरचे सर्व दागिने काढून तिला दिले; आणि सोंगें सजविण्याच्या खोलींत जाऊन लवकर तयार होऊन ये, म्हणून सांगितलें.

नंतर **वासवदत्ता मनोरमे**ला म्हणाली, 'अग **मनोरमे**, तुला आर्य पुत्राचा वेष घ्यायचा आहे, नाहीं का ? आतां त्यांच्याकडे जाऊन त्यांचा सर्व पोषाख मागून आणीपर्यंत पुष्कळ वेळ लागेल, तर तूं असें कर कीं, **नडागिरी**ला* जेरीस आणला यामुळें संतुष्ट झालेल्या आमच्या बाबांनीं आर्यपुत्राला उत्तम पोषाख व अलंकार नजर पाठविले आहेत, ते **इंदिवरि**केजवळ आहेत. तिच्याकडून ते मागून घे, आणि हुबेहुब महाराजांसारखी दिसशील, असें सोंग घेऊन ये पाहूं.'

हें ऐकून **आरण्यका** आणि **मनोरमा** दोघीही सोंगांच्या तयारीस लागल्या. राणीचा हुकूम होतांच **इंदीवरि**केनें तो पोषाख व दागिने **मनोरमे**च्या हवालीं केले. ते घेऊन त्या दोघी सोंगें सजविण्याच्या खोलींत गेल्या.

मुख्य पात्रें येण्यास थोडा अवकाश होता, व तोंपर्यंत **आरण्यका** आणि **मनोरमा** सजून येतील असें

---

* वासवदत्तेचा पिता राजा चंडमहासेन याच्याजवळ नडागिरी अथवा नलगिरी नांवाचा एक मोठा जंगी हत्ती होता. युद्धांत बहुतकरून तो कधींही हार घेत नसे; वासवदत्तेला वत्सराजानें पळविली, तेव्हां त्याच नडागिरी हत्तीवर बसून वासवदत्तेचा थोरला बंधु पालक यानें वत्सराजाचा पाठलाग केला असून वत्सराजानें त्या हत्तीला लढाईत जेरीस आणलें. अशी कथा आम्ही केलेल्या 'बृहत्कथासागर' नांवाच्या पुस्तकाचा भाग पहिला पृष्ठ ८७ येथें सांगितली आहे, ती पहावी.

समजून हिकडे नाटकास आरंभ झाला. सर्व स्त्रियांचा एकसारखा थाट जमला होता. आजचा प्रसंग हा मुद्दाम स्त्रियांकरितांच केलेला असल्यामुळें राजा तेथें येणार नव्हता; व एका अर्थी ही व्यवस्था आज त्याच्या पथ्यावरच पडली होती. **वासवदत्ता, पद्मावती, रत्नावली** इत्यादि सर्व प्रेक्षक स्त्रिया आपापल्या आसनांवर बसल्या, तों काठी टेंकीत टेंकीत एक म्हातारा चोपदार पडद्यांतून बाहेर आला.*

काठीवर आपला भार घालून, उभा राहून सर्व प्रेक्षक मंडळीकडे पाहून, सुस्कारा सोडून, चोपदार म्हणाला, 'अरेरेरेरे! म्हातारपणामुळें काय माझी दुर्दशा होत आहे कोणास ठाऊक? तरी मी जनानखान्यांतला कडेकोट बंदोबस्त ठेवला आहे. वरचेवर कांहीं चुका होतात त्या मी सांवरून घेतों. आणि सांप्रत या जरेनें जर्जरित झाल्यामुळें हातांत घेतलेला हा दंड मला मुख्य आधार झाला आहे. यामुळें हुबेहुब एखाद्या राजाचेंच मी अनुकरण करीत आहें.'

---

* येथपासून नाटकाला प्रारंभ झाला, ही गोष्ट वाचकांनीं ध्यानांत ठेवावी. यापुढें वासवदत्ता, वत्सराज इत्यादिकांचीं जीं नांवें येतील तीं नाटक संपेपर्यंत नाटकांतलीं आहेत असें समजावें. पुढें होणाऱ्या नाटकांतला कथाभाग, 'बृहत्कथासागर' नांवाच्या मराठी ग्रंथाच्या पहिल्या भागांत, सविस्तर आला आहे; व ज्यांनीं तो भाग लक्ष्यपूर्वक वाचला असेल त्यांना पुढच्या नाटकांतील संविधानक उत्तम प्रकारें लक्ष्यांत येईल. आम्ही ठिकठिकाणीं टिपा देऊन संबंध व्यक्त करूं, तरी एकंदरींत तें पुस्तक वाचल्यावांचून समग्र कथा ध्यानांत येणें कठीण पडेल.

प्रेक्षकांला उद्देशून ह्मणाला, 'अहो सर्व मंडळींनों, ऐका. सर्व शत्रूंच्या फौजेचा ज्यानें पराभव केला आहे असें, यथार्थ नांव धारण करणारे महाराज **चंडमहासेन** यांनीं मला अंतःपुरांत कळविण्याविषयीं आज्ञा केली आहे कीं, उद्यां आह्मी **उदयन**राजाच्या नांवाने उत्सव करणार आहों. याकरितां जनानखान्यांतील राण्या व इतर स्त्रिया यांनीं, उत्सवाला शोभेल असा, उत्तम पोशाख करून व आपल्या बरोबरच्या दासीला चांगलें सजवून मन्मथोद्यान नांवाच्या बागेंत जावें.'

**चंडमहासेना**च्या चोपदाराचें सोंग आलें हें पाहून **सांकृत्यायनी** राणीला ह्मणाली, 'राजकन्ये, नाटकाला प्रारंभ झाला बरें का? आतां लक्ष्यपूर्वक पहा.'

चोपदार पुनः म्हणाला, 'महाराजांचा तसा हुकूम झाला आहे; पण दासींसहवर्तमान मन्मथोद्यानांत जावें, इतकेंच सांगितलें म्हणजे पुरे. त्यांना नीट सजवून न्याव्यात असें सांगण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण, यांच्या पायांत पैंजण आहेत. कमरेंत कमरपट्टे असून त्यांला लावलेल्या बारीक घांटांचा आवाज होत आहे. गळ्यांत धारण केलेल्या रत्नांच्या हारांनीं स्तनांवर प्रकाश पडला आहे. रत्नखचित तोळबंद्या व वांक्या दंडांत धारण केल्या आहेत. कानांत कुंडलें आहेत. हातांत रत्नांचीं कंकणें आहेत. डोकींत नाग, चंद्रकोर व फुलें आहेत. अशा ह्या राण्यांच्या दासी स्वतः नेहमीं सजलेल्याच असतात. तेव्हां उत्साहाकरितां आणखी विशेष यांनीं कांहीं दागिने घातले पाहिजेत असें नाहीं. सरकारचा हुकूम झाला, तो कळविला पाहिजे म्हणून मी

निघालों आहें. एरवीं तसें सांगण्याची मुळींच गरज नाहीं. आतां बाकीचा राहिलेला हुकूम बजावला म्हणजे झालें.'

असें बोलून तो राजकन्या **वासवदत्ता** हिच्या जवळ आला. आणि लक्ष्यपूर्वक तिला पाहून म्हणाला, 'हो ! हीच ती **वासवदत्ता** हातांत विणा घेतलेली **कांचनमाला** हिच्या पाठीमागें असून, ही आतां संगीतशाळेंत जात आहे. तर आपणही तेथें जाऊन महाराजांचा हुकूम तिला कळवावा.' इतकें बोलून चोपदार तेथेंच एका बाजूला उभा राहिला.

तों इतक्यांत **वासवदत्तेचा** वेष घेतलेली **आरण्यका**, व हातांत बीन घेतलेली **कांचनमाला**, अशा दोघी पडद्याच्या बाहेर आल्या. **वासवदत्तेचें** सोंग घेतलेली **आरण्यका कांचनमालेला** म्हणाली, 'अग **कांचनमाले**, इतका वेळ झाला तरी आपले बीनकर§(**वत्सराज**)अद्याप कां आले नाहींत?'

---

§ मुळांत 'वीणाचार्य' असा शब्द आहे. संस्कृतांत बीन, सतार, तावूज इत्यादि तंतुवाद्यांना सामान्यतः वीणा असेंच ह्मणतात. पण मागच्या पुढच्या संबंधावरून वीणा शब्दानें येथें बीनच घेतलें पाहिजे, व ह्मणूनच आह्मी 'वीणाचार्य' याबद्दल अगदीं प्रचारांतला बीनकर हा शब्द योजिला आहे. वत्सराज हा वासवदत्तेला संगीत शिकवीत असे. वासवदत्तेनें त्याला वरण्याचा निश्चय अद्याप उघड केला नव्हता, तरी ती मनांतून त्याची पत्नी झाली होती, व त्याच प्रकारचें तिचें कांहींसें वर्तन होतें. ह्मणून ती त्याचें नांव न घेतां नेहमीं बीनकर अथवा वीणाचार्य याच नांवानें त्याचा उल्लेख करीत असे.

**कांचनमाला** ह्मणाली, 'भर्तृदारिके§, त्यांना एक उन्मत्त झालेला वेडा† (**वसंतक**) मनुष्य भेटला आहे. त्यानें कांहीं चमत्कारिक भाषण केलें, तें ऐकून हंसत हंसत मोठ्या कौतुकानें ते तेथेंच उभे राहिले आहेत.'

हें ऐकून¶ **वासवदत्ता*** टाळी वाजवून हंसून म्हणाली, 'अग, त्या वेड्याशीं चांगलें मेतकूट जमलें असेल. उभयतांची स्थिति एकसारखी असली म्हणजे बरें जमतें. दोघेही ( **वसंतक** आणि **वत्सराज** ) उन्मत्तच आहेत!'

---

§ संस्कृत नाटकग्रंथांत, अमक्या अमक्या पात्रांनीं अमुक अमुक पात्रांशीं अमुक अमुक शब्दांनीं बोलावें, असे नियम ठरविले आहेत, त्याप्रमाणें आपल्या धन्याच्या मुलीला चाकरांनीं 'भर्तृदारिका' ह्मणावें असा नियम आहे. तोच उत्तम असल्यावरून आह्मी येथें घेतला आहे. कांचनमाला ही वासवदत्तेची माहेरची कुळबीण होती, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें.

† वत्सराजाला बंदिशाळेंतून युक्तीनें सोडविण्याकरितां यौगंधरायण व वसंतक हे दोघे वेषांतर करून उज्जयिनींत गेले होते. व वसंतक वेड्याच्या रूपानें वत्सराजाच्या अगदीं जवळ राहिला होता, अशी कथा मराठी पुस्तक 'बृहत्कथासागर' याच्या पहिल्या भागांत सांगितली आहे. कांचनमालेनें ज्याला वेडा ह्मटलें तो दुसरा कोणी नसून प्रत्यक्ष वसंतकच होता.

¶ वाचकांचा येथें अंमळ गोंधळ होणार आहे. कारण, खरी वासवदत्ता नाटक पाहण्यास बसली असून नाटकांत आरण्यकेनें तिचें सोंग आणलें आहे. व दोघींचा निर्देश एकाच नांवानें केला आहे. तेव्हां खरी कोणची व खोटी कोणची, हें समजण्यास कठीण पडेल याकरितां नाटकांतल्या वासवदत्तेचें जेथें नांव आलें आहे तेथें त्या नांवापुढें * अशी फुली दिली आहे. त्यावरून ती नाटकांतली वासवदत्ता असें समजावें.

**वासवदत्ता***असें बोलत आहे, इतक्यांत चोपदार पुढें येऊन म्हणाला, 'राजकन्ये, महाराजांनीं असें सांगितलें आहे कीं, उद्यां तूं बीन कसें वाजवतेस तें अवश्य ऐकायचें. तर तूं आपली **घोषवती**‡ नांवाची वीणा नव्या ताराबिरा लावून तयार करून ठेव.'

**वासवदत्ता*** म्हणाली, 'जर असें असेल तर बीनकारांना (**वत्सराजाला**) हिकडे लवकर धाडून दे.'

चोपदार ह्मणाला, 'हो, हा पहा मी आतां **वत्सराजाला** हिकडे पाठवून देतों.' असें सांगून तो निघून गेला.

इकडे **वासवदत्ता*** म्हणाली,'अग **कांचनमाले**, बाई ती **घोषवती** वीणा आधीं हिकडे घेऊन ये. ते बीनकर केव्हां येतील कोणास ठाऊक? तोंपर्यंत तारा बिघडल्या आहेत कीं काय तें एकदां नीट पहातें.' हें ऐकून **कांचनमालेनें घोषवती** आणून दिली, व **वासवदत्ता*** ती आपल्या मांडीवर घेऊन वाजवूं लागली.

इकडे **वत्सराजाचा** वेष घेतलेली **मनोरमा** नाट्यशाळेच्या दरवाज्यांत जाऊन **राजाची** वाट पहात उभी राहिली. **राजा** आला नाहीं असें पाहून ती आपल्याशींच म्हणाली, महाराजांना फार वेळ कां लागला असावा बरें? **वसंतकानें** माझा बेत त्यांना कळविलाच नाहीं कीं काय,

---

‡ वत्सराज उदयपर्वतावर असतां त्यानें एका नागाला प्राणसंकटांतून सोडविलें त्यामुळें प्रसन्न होऊन त्यानें आपल्या प्राणदात्याला कांहीं उत्तमोत्तम वस्तु दिल्या होत्या, त्यांत घोषवती नांवाची वीणा अथवा बीन दिलें होतें. याविषयीं बृहत्कथासागर भाग पहिला पहा.

कोणास ठाऊक! किंवा कळविला असून देखील ते कदाचित् राणीसाहेबांला भीत असतील तर! यावेळीं महाराज येतील तर खरोखर फार चांगलें होईल.

इतक्यांत अंगावरून पायघोळ पांघरूण घेऊन, कोणाला ओळखतां न येईल अशा बेतानें, **वत्सराज** व **वसंतक** दोघेही तेथें आले. **वत्सराज वसंतकाला** म्हणाला, 'अरे, काय सांगूं? माझी आज मोठी चमत्कारिक स्थिति झाली आहे. हा चंद्रमा आज मला असा कांहीं विलक्षण संताप देत आहे कीं, तसा ह्यापूर्वीं त्यानें कधींच दिला नाहीं. माझे अत्यंत उष्ण सुस्कारे अधरोष्ठाला मुकविताहेत. सांप्रत माझें मन अगदीं उदास झालें आहे. शरीरांत पहिल्यासारखी तरतरी नसून तें फार विकळ झालें आहे. वरचेवर मनोरथांचें चिंतन करूं लागलों, तरी दुःख मुळींच कमी होत नाहीं. गड्या **वसंतका**, खरेंच कारे, **मनोरमेनें** तसें सांगितलें? आज नाटकांत त्या माझ्या प्रिय **आरण्यके**चा समागम ती घडवून देणार आहे कारे!'

**वसंतक** म्हणाला, 'माझें सांगणें तुला खरें वाटत नसेल, तर **मनोरमा** तुझा वेष घेऊन ती पहा दरवाज्यांत उभी राहिली आहे, तिला जाऊन विचार.'

हें ऐकून **राजा** लवकर लवकर **मनोरमे**जवळ जाऊन तिला ह्मणाला, 'अग **मनोरमे**, हा **वसंतक** कांहीं सांगतो आहे, तें खरें का?'

**मनोरमा** ह्मणाली, 'होय सरकार, अगदीं खरें आहे पण आतां फार वेळ लावूं नका. हा मी आपला सर्व पोषाख आणला आहे तो धारण करून लवकर रंगभूमीवर चला.

हें ऐकून राजाला किती आनंद झाला असेल त्याचें वर्णन करवत नाहीं. त्यानें तिनें दिलेले सर्व अलंकार घेऊन तत्काल आपल्या अंगावर धारण केले व पोषाख करून अगदीं तयार झाला.

एवढा मोठा राजा असून तो एका सामान्य कामाकरितां मनोरमेसारख्या यःकश्चित् बटकीचें सांगणें मान्य करितो हें पाहून, वसंतकाला हंसूं आलें. तो ह्मणाला, 'वाहवा ! काय चमत्कार आहे पहा ! हे एवढे मोठे राजे असून यांना या बटकींच्या पोरी हवें तसें नाचवितात ! गरजवंत झालेले हेही नाचतात, तेव्हां एकंदरींत गरजवंताला अक्कल नसते, यांत कांहीं संशय नाहीं.'

हें ऐकून राजा हंसून म्हणाला, 'मूर्खा ! तुला कांहीं काळ वेळ आहे कीं नाहीं रे ? ही थट्टेची वेळ नव्हे. मुकाट्यानें या मनोरमेसह जवळच्या चित्रशाळेंत जाऊन बैस आणि तेथून आपली कशी काय सोंगाची बतावणी करतों तें पहात रहा.'

वसंतक म्हणाला, 'बरें बाबा, आपण या वेळीं मोठा पराक्रमच करायाला जात आहां. तेव्हां सांगाल तसें ऐकिलेंच पाहिजे.' असें बोलून तो मनोरमेसह चित्रशाळेंत गेला.

इकडे राजा पडद्याच्या आंतल्या बाजूला अगदीं जवळ येऊन उभा राहिला. इकडे थोडा वेळ बीन वाजवून वासवदत्ता* म्हणाली, 'अग कांचनमाले, हें बीन घटकाभर असूंदे आतां. मी तुला कांहीं विचारतें.'

हें ऐकून पडद्याच्या आंत उभा राहिलेला राजा ती काय म्हणते तें कान देऊन ऐकत राहिला. कारण, त्याला

आपलें सोंग पडद्याच्या बाहेर आणण्यास सवड पाहिजे होती.

कांचनमाला म्हणाली, 'भर्तृदारिके, काय विचारायचें तें विचार.'

वासवदत्ता* म्हणाली, 'बाबा असें म्हणतात म्हणे कीं, बीन वाजवीत वत्सराज वासवदत्तेला हरण करील तर मी त्याला अवश्य मोकळा करीन, हें खरेंच का ग?'

हें ऐकून, हाच उत्तम समय असें समजून, राजा एकदम पडद्याच्या बाहेर आला, आणि आपल्या अंगावरच्या शेल्याची आणि वासवदत्तेच्या* पदराची गांठ मारून म्हणाला, 'होहो! असेंच. यांत काय संदेह? हें बीन वाजवून, सर्व मंडळीसह चंडमहासेनाला अगदीं थक्क करून सोडून, लवकरच वासवदत्तेचें* मी हरण करतों कीं नाहीं, तें पहा.' हळूच म्हणाला, 'यौगंधरायणानें सर्व तयारी करून ठेविलीच आहे.'

मनोरमेनें वत्सराजाचें सोंग घेऊन यावें असा पूर्वी संकेत झाला होता; पण सांप्रत सोंग नसून प्रत्यक्षच वत्सराज आला आहे, हें नाटक पहात बसलेल्या त्या भोळ्या वासवदत्तेच्या लक्षांत आलें नाहीं. तरी वत्सराज आलेला पाहून, वासवदत्ता चपापल्यासारखी होऊन, एकदम उठून 'आर्यपुत्राचा जयजयकार असो,' असें म्हणाली.

राजाचें हें कपट वासवदत्तेच्या लक्षांत आलें नव्हतें. तिच्या तोंडांतून सहज ते शब्द निघाले, तरी चोराच्या मनांत भय असतेंच. वत्सराज मनांत म्हणाला, 'अरेरे! राणीनें मला ओळखलेंसें वाटतें!'

नाटकांतल्या वत्सराजाला पाहून वासवदत्ता* उठून

उभी राहिली, हें पाहून सांकृत्यायनी हंसून तिला म्हणाली, 'अग राजकन्ये, उठूं नको, उगीच गडबडलीस कां? हें नाटक आहे. खरोखरी वत्सराज येथें नाहीं.'

सांकृत्यायनीनें आपली बाजू संभाळली असें समजून, राजा आनंदानें मनांत म्हणाला, बरें झालें. आतां माझ्या जिवांत जीव आला, नाहींतर एव्हांशींच कपट उघड झालें कीं काय म्हणून मला भय वाटत होतें.

सांकृत्यायनीनें हें नाटक आहे म्हणून सांगतांच वासवदत्तेला आठवण झाली, व आपण वेड्यासारखें हें काय केलें याची तिला मोठी लाज वाटली. ती अंमळ खजील होऊन हंसत खालीं बसली, आणि सांकृत्यायनीला म्हणाली, 'एकूण ही मनोरमाच तर! मी समजलें होतें कीं, हे आर्यपुत्र. शाबास मनोरमे, शाबास! तूं अगदीं हुबेहूब सोंग घेतलेंस.'

सांकृत्यायनी वासवदत्तेला म्हणाली, 'राजकन्ये, मनोरमेनें तुला भ्रांति उत्पन्न केली, हें योग्यच आहे. कारण, नेत्रांना आनंद देणाऱ्या वत्सराजाच्या रूपासारखेंच हें रूप दिसतें. पोषाखही हुबेहूब तोच. उन्मत्त हत्तीसारखी चालण्याची ढबही तीच. सामर्थ्यही तेंच. लीलाही तीच. सजल मेघासारखा गंभीर आवाजही तोच. आज ह्या चतुर मनोरमेनें अगदीं हुबेहूब दुसऱ्या वत्सराजाचेंच आपल्याला दर्शन दिलें असें वाटतें.'

वत्सराज वासवदत्तेला वीन शिकवीत होता, त्यावेळीं तो कैदेंत होता. ह्मणूनच त्याच्या पायांत त्यावेळीं बेडी होती. सांप्रत रंगभूमीवर आलेल्या वत्सराजाच्या

त्या वेळच्या स्थितींत बेडीचा उणेपणा आहे असें लक्षांत आणून, **वासवदत्ता** **इंदीवरिके**ला म्हणाली, 'अग **इंदीवरिके**, आर्यपुत्रानें मला बीन वाजवायला शिकविलें, त्यावेळीं त्यांच्या पायांत बेडी होती; तर तूं आतां हा नीलकमलांचा हार घेऊन जा, आणि ह्यानें त्यांचे पाय बांधून ये.' असें बोलून **वासवदत्तेनें** आपल्या अंगावरचा कमलांचा हार काढून तिच्याजवळ दिला, व **इंदीवरिकेनें** त्या हारानें रंगभूमीवर आलेल्या **वत्सराजाचे** पाय बांधले, आणि ती परत **वासवदत्तेच्या** मागें येऊन उभी राहिली.

इकडे नाटकांतली **वासवदत्ता*** म्हणाली, 'अग **कांचनमाले**, सांग सांग, बाबांनीं, वीणा वाजवीत असतां **वत्सराजानें** माझें हरण केलें तर त्याला बंधनांतून सोडायचें असें म्हटलें, हें खरें काय?'

**कांचनमाला** म्हणाली, 'भर्तृदारिके, खरेंच, महाराजांनीं असें म्हटलें होतें. आतां महाराजांला तूं फार आवडशील असें कर.'

**वासवदत्तेच्या*** प्रश्नावर **राजाला** कांहीं उत्तर देण्यासारखें नव्हतें. तो म्हणाला, 'आपल्याला जें इष्ट होतें तें ह्या **कांचनमालेनें** सर्व केलें.'

**कांचनमालेचें** भाषण ऐकून **वासवदत्ता*** म्हणाली, 'अग, तूं म्हणतेस तसें असेल, तर मी हें बीन मोठ्या अगत्यानें वाजवीन.' असें बोलून बीन वाजवून **वासवदत्तेनें*** एक चीज गायली.

जलद बंधनें रोधियलेल्या ।
गगना पाहुनि उत्सुक झाला ॥ ध्रु० ॥

घेउनि दयिता, आपुल्या स्थाना ।
मानस सरसीं इच्छित जाण्या ॥ १ ॥

इकडे **वसंतक** चित्रशाळेच्या दारांत बसला होता, त्याला डुलक्या येऊं लागल्या होत्या. नाटक पाहण्याकडे त्याचें मुळींच लक्ष्य नव्हतें. **आरण्यकेनें** फारच उत्तम चीज म्हटली, ती ऐकून **मनोरमेला** मोठा आनंद झाला. ती **वसंतकाला** हालवून जागा करून म्हणाली, 'अरे भद्रच्या, सारा वेळ निजतोस काय! हिकडे काय मौज चालली आहे ती पहा. माझी प्रियसखी (**आरण्यका**) कसें गाते आहे तें अंमळ ऐक तरी.'

**वसंतक** यावेळीं झोंपेच्या गुंगींत होता. **मनोरमेनें** त्याच्या झोंपेचा मोड केला, म्हणून तो रागावून म्हणाला, 'अग बटकीचे कार्टे! तूं देखील हात धुवून माझ्या पाठीस लागली आहेस काय? बटकीची मला निजूं देखील देत नाहीं! माझ्या प्रियमित्रानें जेव्हां त्या **आरण्यकेला** पाहिलें तेव्हांपासून मला झोंप कसली ती मुळींच ठाऊक नाहीं. यावेळीं तो तिकडे नाचरंगांत आहे म्हणून मी आपला अंमळ निजलों होतों, ती तूं माझी झोंप मोडलीस. मी आतां येथून त्या तिकडे जाऊन निजतों.' असें बोलून **वसंतक** दुसरीकडे जाऊन निजला.

इकडे **वासवदत्तेनें*** आणखी एक चीज म्हटली.

सखि, सांगुं तुजला कितितरि बाई ।
मधुकारिका हे व्याकुळ झाली ॥ ध्रु०
अभिनवरागें वेडीच केली ।
कुटिलें मदनें तप्त जहाली ॥ सखि० ॥ १ ॥

प्रार्थितसे ही निज दयिताचें ।
दर्शन लवकरि प्रेमरसाचें ॥ सखि० ॥ २ ॥

ती ऐकून **राजा** तिच्या अगदीं जवळ जाऊन म्हणाला, ‘ शाबास, राजकन्ये शाबास! वाहवा! याचें नांव गायन, आणि याचें नांव वाद्यें वाजविणें. कारण ताल आणि सूर यांचा समलय झाला असून यांत कोठेंच कांहीं कमी पडलें नाहीं. ’

**राजा** एकाएकीं जवळ आला, तेव्हां **वासवदत्ता*** बीन खालीं ठेवून त्याला टेकून उभी राहिली; व अभिलाषपूर्वक **राजा**कडे पाहून ह्मणाली, ‘ गुरुजी ’ नमस्कार करतें.’

**राजा** ह्मणाला, ‘ जें माझ्या मनांत आहे तें तुला प्राप्त होवो ! ’

इतक्यांत **कांचनमाला, वासवदत्ता*** ज्या आसनावर बसली होती, त्याच्याकडे बोट दाखवून ह्मणाली, ‘ गुरुजी, आपण याच आसनावर बसावें.’

हें ऐकून **राजा वासवदत्ते**च्या* आसनावर बसून ह्मणाला, ‘ मी तर बसलों; पण ही राजकन्या (**वासवदत्ता*** ) कोठें बसेल ? ’

यावर **कांचनमाला** हंसून ह्मणाली, ‘आपण शिकविलेली विद्या दाखवून आतांच हिनें आपल्याकडून शाबासकी मिळविली आहे. तेव्हां आतां ही दुसरीकडे कोठें बसणार ? गुरुजींच्याच आसनावर बसेल. ’

**राजा**ला हें पाहिजेच होतें. तो ह्मणाला, ‘ बसूंदे. माझें अर्धें आसन घेण्याला ही योग्यच आहे.’ **वासवदत्ते**ला* ह्मणाला, ‘ राजपुत्रि, बैस येथें. ’

हें ऐकून **वासवदत्ता*** लाजून **कांचनमाले**च्या तोंडाकडे बघूं लागली. तेव्हां **कांचनमाला** हंसून ह्मणाली, 'भर्तृदारिके, ते सांगतात तेथें बैस. त्यांत काय दोष आहे? तूं त्यांचीं पट्टशिष्यीण आहेसच.' नंतर **वासवदत्ता*** लाजत लाजत **वत्सराजा**जवळ आसनावर बसली.

नाटकांत चाललेला हा प्रकार **वासवदत्तेनें** प्रत्यक्ष अनुभवलेलाच होता, व तिला त्याची चांगली आठवणही होती. **आरण्यका वत्सराजा**च्या जवळ बसली, हें पाहून **वासवदत्ता** लाजून **सांकृत्यायनी**ला ह्मणाली, 'भगवति, हा भाग तुह्मी यांत अधिक घातला आहे. मी नाहीं त्यावेळीं आर्यपुत्राबरोबर एकाच आसनावर बसलें.'

इकडे **राजा वासवदत्ते**ला* म्हणाला, 'राजकन्ये, मला ऐकण्याची फार इच्छा आहे. पुनः एकदां बीन वाजीव पाहूं.'

**वासवदत्ता*** हंसून **कांचनमाले**ला म्हणाली, '**कांचनमाले**, बाई खरोखरच फार वेळ वीणा वाजविल्यामुळें मला श्रम झाले आहेत. या वेळीं मी अगदीं आळसावलें आहें, म्हणून आतां माझ्यानें वीणा वाजववत नाहीं.'

**कांचनमाला राजाला** म्हणाली, 'गुरुजी, आमची भर्तृदारिका खरोखरच फार श्रमली आहे. हिच्या गालांवर घामाचे बिंदु आले आहेत कीं नाहीं ते पहा. हिचे हात कांपताहेत, तेव्हां घटकाभर हिला विश्रांति घेऊंद्या.'

हें ऐकून **राजा** म्हणाला, 'फार चांगलें बोललीस. खुशाल विश्रांति घेऊं दे.' असें बोलून त्यानें तिच्या अंगावरचा घाम पुसण्याकरितां हात पुढें केला. तेव्हां **वासवदत्तेनें*** लाजून तो मागें सारला.

तें पाहून **वासवदत्ता** असूयापूर्वक **सांकृत्यायनीला** म्हणाली, ' भगवति, हा देखील प्रसंग तुम्ही पदरचाच घातला आहे. **कांचनमालेच्या** खुबीदार बोलण्यानें मी अशी फसलें नव्हतें. '

**सांकृत्यायनी** हंसून म्हणाली, ' आयुष्मति, काव्य म्हटलें म्हणजे तें असेंच असतें. त्यांत प्रसंगाला साजेल असें केव्हां केव्हां पदरचें देखील घालावें लागतें. '

इकडे **कांचनमालेचें** भाषण ऐकून **वासवदत्ता*** रागावून म्हणाली, ' चल जा, **कांचनमाले**, तूं येथून नीघ. मला तूं अगदीं आवडत नाहींस ! '

**कांचनमाला** हंसून म्हणाली, ' जर मी येथें असलेली तुला खपत नाहीं, तर ही पहा मी आपली जातें,' असें बोलून ती निघून गेली.

**कांचनमाला** गेली हें पाहून **वासवदत्ता*** घाबरून म्हणाली, 'अग **कांचनमाले**, अग **कांचनमाले**, जाऊं नको, जाऊं नको, तुझ्या सांगण्याप्रमाणें हा पहा मी आपला हात यांच्या ( **राजाच्या** ) हातांत दिला.'

हें ऐकून **कांचनमाला** मागें परतली. **राजा वासवदत्तेचा*** हात आपल्या हातांत धरून तिला म्हणाला, ' नुकतेच दंवाचे थेंब पडल्यामुळें अत्यंत गार झालेलें हें कमल असेल; पण अगदीं पहांटेस कमलाच्या अंगीं तितकी शोभा नसल्यामुळें तें फारसें आनंदकारक होत नाहीं. पांच बोटांचीं पांच नखें हेच पांच चंद्र, हे वरचेवर बर्फ वर्षताहेत, आणि तो चंद्र तर अतिशय दाह करितो. तसाच याला घाम आला आहे आणि या घामाच्या मिषानें यांतून अमृताचा स्राव होत आहे !'

'तसेंच पोंवळ्याच्या वेलीची शोभा हरण करण्या-विषयीं कुशल असा जो हा तुझा हात त्यानें त्वां माझ्या ह्रदयांत रागाची (प्रेमाची) स्थापना केलीस.'

**कांचनमाला** किंवा **आरण्यका** ह्या दोघींला ती मस-लत माहीत नव्हती. हावेळपर्यंत त्या दोघीही, **राजाचा** वेष घेतलेली **मनोरमाच** आपल्याजवळ आहे, असें समजत होत्या; पण **आरण्यकेचा राजानें** हात धरला, तेव्हां तत्काल त्या चतुर कन्येला, तो पुरुष आहे, असें समजलें, व त्याच्या स्पर्शानें तिच्या मनाची स्थिति निराळ्याच प्रकारची झाली आणि ती त्याच्याकडे पाहून ह्मणाली, 'अरेरे! ह्या **मनोरमेला** स्पर्श करीत असतां माझ्या अंगाची स्थिति कांहीं विलक्षण झाली, हें काय!'

प्रत्यक्ष **राजाच** रंगभूमीवर आला आहे हें, हावेळ-पर्यंत **वासवदत्तेच्या** देखील लक्ष्यांत आलें नव्हतें. ह्या **मनोरमेच्या** स्पर्शानें आपल्या शरीराची स्थिति चमत्कारिक झाली, असें **आरण्यकेनें** म्हटलें, तें ऐकून राणी **वासवदत्ता** एकदम उठून उभी राहिली, आणि **सांकृत्यायनीला** म्हणाली, 'भगवति, आतां हें नाटक तूंच पहा. मला ह्या भलभलत्या गोष्टी पहावत नाहींत. एकापुढें एक खोटेंच सारें! मी आपली जातें.'

**सांकृत्यायनी** म्हणाली, 'राजकन्ये, यांत रागावण्यासारखें काय आहे बरें? शास्त्रांत सांगितलेला हा गांधर्वविवाह आहे. यांत लाजण्याचें कारण काय? तशांतून हें नाटक. येथें खऱ्या गोष्टी थोड्याच आल्या आहेत; असें असून तूं रसभंग करून मध्येंच उठून जातेस हें मला नाहीं चांगलें वाटत.'

**सांकृत्यायनीनें** असें सांगितलें तरी **वासवदत्तेनें** तें ऐकलें नाहीं. ती तत्काल जनानखान्याकडे जावयास निघाली. चित्रशाळा आणि नाट्यशाला या दोन्हीही इमारती अगदीं जवळ जवळ असून एकमेकींच्या समोरासमोर होत्या. **वासवदत्तेबरोबर** तिच्या सर्व दासी वगैरेही निघाल्या होत्या. इंदीवरिकेचें लक्ष्य चित्रशाळेच्या दरवाज्याकडे गेलें; तेव्हां तेथें **वसंतक** निजला होता, तो तिनें **वासवदत्तेला** दाखविला.

**वासवदत्ता** त्याच्या जवळ जाऊन न्याहाळून पाहून म्हणाली, **वसंतकच** हा येथें आहे. तेव्हां महाराजही येथेंच असतील. तर याला जागा करून, ते कोठें आहेत, तें विचारावें. असा विचार करून **वासवदत्तेनें इंदीवरिकेकरवीं** त्याला जागा केला.

**वसंतक** झोंपेच्या ऐन भरांत होता, तो तसाच जांभया देत उठून बसला, आणि चहूंकडे पाहून **मनोरमे**ला म्हणाला, 'अग **मनोरमे**, प्रियमित्र आपल्या सोंगाचा भाग पुरा करून आला का? कीं अजून तिकडेच आहे?'

आपल्याला **वासवदत्तेनें** उठविलें, व जवळ उभी राहिली आहे ती **मनोरमा** नसून **वासवदत्ता** आहे, हें **वसंतकाला** समजलें नव्हतें. त्यानें अद्याप डोळे पुरते उघडलेच नव्हते. झोंप लागण्यापूर्वीं **मनोरमा** त्याच्या जवळ होती, हेंच त्याच्या डोक्यांत घोळत होतें.

**वसंतक** झोंपेंत चळला; पण त्याच्यायोगानें मोठाच अनर्थ उडाला. **वासवदत्ता** नाटक पहावयाचें सोडून निघाली, ती केवळ, आपण न केलेल्या गोष्टी **सांकृत्यायनीनें** त्यांत घातल्या आहेत म्हणून तिला तें नाटक

आवडलें नव्हतें. पण प्रत्यक्ष राजा रंगभूमीवर आला आहे, हें तिला मुळींच ठाऊक नव्हतें. **वसंतकाच्या** बरळण्यावरून प्रत्यक्ष राजाच रंगभूमीवर आला आहे हें तिच्या लक्ष्यांत आलें. ती खिन्न होऊन म्हणाली, 'खरोखर आर्यपुत्र का नाटकांत आला आहे; आणि **मनोरमा** यावेळीं कोठें आहे ?'

**वसंतक** म्हणाला, 'ती पहा चित्रशाळेच्या दारांत आहे.'

हें ऐकून बिचाऱ्या **मनोरमेची** पांचावर धारण बसली. ती जवळच तेथें उभी होती. ती मनांत म्हणाली, बाईसाहेबांनीं भलतीच शंका घेऊन असें कसें विचारलें ? आणि या मूर्ख भटुरड्यानें भलतेंच सांगून सगळा घोंटाळा कसा केला?

**वासवदत्तेनें मनोरमेला** हाक मारली, तेव्हां ती कांपत कांपत पुढें आली. तिला पाहून रागानें हंसत **वासवदत्ता** म्हणाली, 'शाबास **मनोरमे**, चांगलें ! तूं आपल्या सोंगाची बतावणी तर बरीच केलीस म्हणायची !'

हें ऐकून **मनोरमा** थरथर कांपत **वासवदत्तेच्या** पायांवर पडून म्हणाली, 'बाईसाहेब, खरोखर यांत माझा कांहीं अपराध नाहीं. ह्या मेल्या **वसंतकानें** माझ्या हातांतून ते अलंकार हिसकून घेतले, आणि मला येथें कोंडून ठेवलें. मी एकसारखी येथें ओरडत होतें; पण ह्या मूर्खानें जी गडबड केली, तीपुढें माझें ओरडणें कोणालाही ऐकूं आलें नाहीं.'

**वासवदत्ता** म्हणाली, 'अग ऊठ, ऊठ; मला सारें समजलें. ह्या **आरण्यकेच्या** वृत्तांतरूपी नाटकांत हा **वसंतक** सूत्रधार आहे. हें आतां माझ्या चांगलें लक्ष्यांत आलें'

**वसंतक** भिऊन ह्मणाला, ' उगीच गरीब ब्राह्मणावर बालंट घेऊं नका. नीट विचार करून पहा. कोठें **आरण्यका** आणि कोठें **वसंतक**. दोघांचा कांहीं संबंध तरी आहे का ! '

**वसंतका**चें हें बोलणें **वासवदत्ते**ला मुळींच खरें वाटलें नाहीं. ती रागानें **मनोरमे**ला ह्मणाली, 'अग, पहातेस काय ? ह्या चाहटळ भटाच्या मुसक्या बांध, आणि याला जनानखान्यांत घेऊन ये; मग याचें कसें काय होतें तें पाहीन.'

वस्तुतः **मनोरमे**चीच सगळी मसलत होती; पण तिनें युक्तीनें ती **वसंतका**च्या अंगावर ढकलली; व त्याप्रमाणें राणीलाही तिचें बोलणें अंमळ खरें वाटलें; तेव्हां तिचा जीव थोडा खालीं बसला. ती **वसंतका**चे हात बांधून ह्मणाली, ' मेल्या! आतां आपल्या कर्माचें फळ भोग ? '

**वासवदत्ता** जायाला निघाली होती, पण तिला हें कपट समजल्यावरून **राजाला** टोला मारण्याकरितां ती परत रंगभूमीवर येऊन **राजाला** ह्मणाली, ' आर्यपुत्र, मी ही अशुभ **गोष्ट** केली, हें फार चुकलें. कमळाच्या माळेनें तुमचे पाय बांधले हें चांगलें झालें नाहीं.' **राजा**च्या पायाला बांधलेली माळा सोडून घेऊन ह्मणाली,'आर्यपुत्र, क्षमा करा. **मनोरमा** असें समजून मी तुमचे पाय बांधायाला लावले, हा मोठाच अपराध झाला. '

हें ऐकतांच बिचाऱ्या **आरण्यके**ची पांचावर धारण बसली. ती **राजा**जवळ बसली होती, तेथून चटकन् उठून थरथर कांपत एका बाजूला उभी राहिली. **राजा** हात बांधलेल्या **वसंतका**ला व **मनोरमे**ला पाहून, मनांत

ह्मणाला, अरेरे! फार वाईट झालें. राणीनें मला ओळखलें असें वाटतें !

**सांकृत्यायनी**ला ह्या गोष्टी मुळींच माहीत नव्हत्या असें नाहीं. **राजा** रंगभूमीवर आला, तेव्हांच तिनें त्याला ओळखलें; तथापि ती गोष्ट तिला व्यक्त करतां आली नाहीं. सांप्रत हा गोंधळ झालेला पाहून ती हंसून ह्मणाली, 'ओहो! ह्या नाटकाचा कांहीं चमत्कारिकच परिणाम झाला आहे. तेव्हां आमच्यासारख्यांनीं आतां येथें बसणें योग्य नाहीं.' असें बोलून ती मुकाट्यानें निघून गेली.

**राजा** मनांत ह्मणाला, 'ही (**वासवदत्ता**) यापूर्वी पुष्कळ वेळ रागावली होती; पण आजचा राग कांहीं निराळ्या प्रकारचा आहे. यावेळीं हिचें समाधान होणें फार कठीण आहे असें वाटतें. तथापि पायां पडून पहावें. असा विचार करून **वासवदत्ते**ला ह्मणाला 'प्रिय राणी राग सोड.'

**वासवदत्ता** सुस्कारा सोडून म्हणाली, 'आर्यपुत्र, कोण येथें रागावलें आहे!'

**राजा** म्हणाला, 'रागावली नाहींस असें कसें होईल? तुझी दृष्टि प्रेमळ दिसते आहे, तरी डोळे लाल झाले आहेत. बोलण्यांत माधुर्य आहे, तरी शब्द उच्चारतांना जीभ अडखळते. श्वास नियमित आहे, तरी स्तन कंपायमान होताहेत. तूं मोठ्या प्रयत्नानें आपला राग आवरून धरला आहेस, तरी ह्या लक्षणांवरून तो स्पष्ट दिसतो.' असें बोलून तिच्या पायांवर सपशेल लोटांगण घालून म्हणाला, 'क्षमा कर ! क्षमा कर !'

**वासवदत्ता आरण्यके**ला अलीकडे ओढून म्हणाली, ' अग **आरण्यके**, तूं रागावली आहेस असें मानून, आर्यपुत्र, 'प्रिये, प्रसन्न हो,' असें म्हणून क्षमा मागत आहे तर त्यांच्या जवळ ये, आणि एकदांची प्रसन्न हो !'

**आरण्यका** गर्भगळित झाली होती. ती म्हणाली, 'बाईसाहेब, मला यांतलें कांहींच ठाऊक नाहीं.'

वस्तुतः **आरण्यके**चें सांगणें खरें होतें. तिचें **राजावर** प्रेम जडलें होतें, तरी यावेळच्या मसलतींत तिचें अंग मुळींच नव्हतें; पण **वासवदत्ते**ला तें खरें वाटलें नाहीं. ती म्हणाली, ' हंहं ! **आरण्यके**, तुला ठाऊक नाहीं असें कसें होईल ? मी आतां तुला चांगलें शिकवितें. **इंदीवरिके**, पाहतेस काय ? ह्या उनाड कार्टीचे हात बांध. '

राणीचा हुकूम होतांच **इंदीवरिके**नें **आरण्यके**चे हात बांधले. **कांचनमाला** ही राणीची अत्यंत जिव्हाळ्याची दासी होती; पण तिला यांतला कांहीं मागमूस देखील ठाऊक नव्हता व ती अशी कांहीं मसलत करील अशी राणीला शंका देखील आली नाहीं. तेव्हां अर्थात् **कांचनमाला**, चकित होऊन मुकाट्यानें काय होतें, तें पहात होती.

**वसंतक** खरोखरीच या मसलतींत होता, व राणी त्याच्यावर रागावली ती योग्यच रागावली; तरी कांहीं समजुतीच्या गोष्टी सांगून पहाव्या म्हणून तो राणीला म्हणाला, 'अहो राणीसाहेब, अशा रागावता कां ? आज कौमुदीमहोत्सव आहे, तेव्हां तुमच्या मनाला करमणूक करण्याकरितां माझ्या मित्रानें ( राजानें ) हें एक

मजेदार नाटक केलें आहे. त्याबद्दल इतका राग मानण्याचें काय कारण ?'

**वासवदत्ता** म्हणाली, 'हीं तुमचीं कर्मे पाहून मला एक प्रकारें हंसूं येतें.'

**राजा** म्हणाला, 'देवि, भलतीच कल्पना घेऊं नको, अशी हिकडे पहा. भिवया वर चढवून ललाटरूपी चंद्राला उगीच कां कलंकित करतेस ? वाऱ्यानें हालणाऱ्या लाल दुपारीच्या फुलांसारखा हा तुझा ओंठ एकसारखा कां स्फुरण पावत आहे? अत्यंत कंपित झालेल्या स्तनांच्या भारानें ही कंबर वांकल्यासारखी कां दिसते ? प्रिये, राग सोड. खरोखर तुझ्याच मनोरंजनाकारितां मीं हें नाटक केलें. देवि, प्रसन्न हो, प्रसन्न हो !' असें बोलून **राजा** पुनः तिच्या पायां पडला.

राजाच्या ह्या मानभावी बोलण्यानें तिचा राग मुळींच गेला नाहीं; उलट अधिकाधिक प्रदीप्तच झाला. ती **इंदीवरिकेला** म्हणाली, 'अग, नाटक पाहून झालें; चल आतां आपण जनानखान्यांत जाऊं या.' असें बोलून ती, **वसंतक** आणि **आरण्यका** या दोघांना बरोबर घेऊन, आपल्या दासींसहवर्तमान निघून गेली.

आपण इतकें सांगितलें तरी राग न सोडतां राणी निघून गेली, हें पाहून **राजा** उद्विग्न होऊन म्हणाला, 'अरेरे ! एकूण माझ्यावर अनुग्रह केल्यावांचून राणी गेली, हें चांगलें झालें नाहीं.'

राजाचें लक्ष्य यावेळीं दोहोंकडे गुंतलें होतें. रागावलेली राणी **वासवदत्ता** व त्याचें प्रीतिपात्र **आरण्यका**, या दोघींच्या मूर्ति त्याच्या डोळ्यांपुढें उभ्या होत्या. तो

त्यांना उद्देशून म्हणाला, 'घामाच्या उदकाचे थेंब ज्याच्यावर उठले आहेत व कपाळाला आंठ्या घातल्यामुळें भयंकर दिसणारें असें राणीचें मुख, व भयभीत होऊन उडत उडत जाणाऱ्या हरिणीच्या नेत्रांसारखे जिचे नेत्र आहेत अशा **आरण्यकेचें** मुखकमल, या दोहोंकडे पहात असतां, भय आणि उत्कंठा असे दोन्हींही विकार एकदम उत्पन्न होऊन त्यांनीं मला मोठ्या संकटांत पाडलें आहे. राणीला प्रसन्न करून घेतल्यावांचून आपला हेतु पूर्ण व्हावयाचा नाहीं; तर आपण आतां शेजघरांत जावें, व तेथें तिला प्रसन्न करण्याचा उपाय योजून ठेवावा.' असा विचार करून **राजा** शेजघराकडे गेला, व इतर मंडळी हा चमत्कार पाहून आपापल्या ठिकाणीं गेली.

---

## भाग चवथा.

राणीनें **वसंतक** व **आरण्यका** या दोघांना अंतःपुरांत नेलें, आणि तेथें त्यांना योग्य शिक्षा द्यावी असा विचार करून दोघांनाही एकाच खोलींत कोंडून ठेवलें. प्रतिदिवशीं त्यांच्या खाण्यापिण्याची वगैरे व्यवस्था तेथेंच करून, त्यांला खोलीच्या बाहेर जाण्यास मिळूं नये असा बंदोबस्त केला. याप्रमाणें **वसंतक** कैदेंत पडला, तरी तो लवकरच कांहीं युक्ति करून तींतून मोकळा झाला. बिचारी **आरण्यका** मात्र तशीच होती. **आरण्यकेला**, **राजाची** प्राप्ति होईल, अशी प्रथम विशेष आशा नव्हतीच; त्यांतून आतां तर ती अगदींच निराश झाली

होती. दुःखानें व कष्टानें पीडित झालेली ती, अशा स्थितींत राहण्यापेक्षां मरावें हें बरें, असा विचार करून आत्मघात करून घेत होती; पण तिच्यावर देखरेख ठेवण्याचें काम **मनोरमेकडे** होतें, व **मनोरमा** तिची प्रियमैत्रीण होती; तेव्हां **आरण्यका** आत्मघात करून घेत आहे हें पाहतांच तिनें तिचें निवारण केलें, व कांहीं समजुतीच्या गोष्टी सांगून तिचें मन शांत केलें. यावेळीं **आरण्यकेवर** मोठा दुःखाचा प्रसंग कोसळला होता, व त्यांत तिचा कदाचित् शेवट होईल असें देखील वाटत होतें; पण दैवाला तिची दया येऊन लवकरच सुटका होण्याचा प्रसंग आला.

**मनोरमा** वरचेवर तिकडची हकीकत राजाला गुप्त रीतीनें कळवीत होती. **आरण्यकेनें** आत्मघात करण्याचा विचार केला होता, ती हकीकत राजाला कळवावी ह्मणून ती **वसंतकाला** जाऊन भेटली, आणि त्याला सर्व वर्तमान जाऊन सांगितलें.

**मनोरमा** हें काम करून परत येत असतां फारच उद्विग्न होऊन ह्मणाली, काय करावें! बाईसाहेबांचा राग फारच कठीण आहे. माझी प्रियसखी, गरीब विचारी **आरण्यका**, आज इतके दिवस प्रतिबंधांत पडली असून अद्यापि बाईसाहेबांला तिची दया येत नाहीं! महाराजांच्या भेटीविषयीं निराशा झाल्यामुळें तिला जितकें दुःख वाटतें, तितकें आपण प्रतिबंधांत पडल्याचें तिला वाटत नाहीं. ती आज खरोखर आपला प्राणच देणार होती. मी त्यावेळीं तेथें पोचलें ह्मणून बरें झालें. पण तिची सुटका होणार तरी कशी?

महाराजांवांचून तिची सुटका करण्यास दुसऱ्या कोणाची छाती आहे ? मी त्यांना ही हकीकत कळेल अशी तजवीज करून आलें आहें; पण त्याचा काय उपयोग होतो तो पहावा.

**मनोरमा** असा विचार करीत येत आहे, इतक्यांत राणीच्या हुकुमावरून **सांकृत्यायनी**ला बोलावून आणण्यास निघालेली **कांचनमाला** तेथें येऊन पोहोंचली.

पहिल्या भागाच्या प्रारंभीं **प्रियदर्शिके**चा बाप **दृढवर्मा** ह्याला **कलिंग**राजानें आपल्या येथें बंदिशाळेंत ठेविलें होतें हें सांगितलेंच आहे. **दृढवर्म्यां**चे सरदार व त्याचे आप्तसंबंधी त्याची सुटका करण्याविषयीं एकसारखे प्रयत्न करीत होते; पण त्यांचा कांहीं उपाय चालला नाहीं. त्यांनीं राज्याचा कसा तरी बंदोबस्त ठेवला होता; पण **दृढवर्मा** बंदींतून कसा सुटेल, याची मोठी काळजी होती.

**दृढवर्म्या**वर तसें संकट वस्तुतः **वत्सराजा**मुळेंच आलें होतें असें ह्मटलें तरी चालेल. व **वत्सराज कलिंग**राजाला जिंकून **दृढवर्म्या**ला सोडवून घेण्यास समर्थ होता; व तो मोठा मानी असल्यामुळें तें काम करील असें होतें, तरी त्याला देऊं केलेली राजकन्या **प्रियदर्शिका** हिचा कांहीं ठावठिकाण देखील माहीत नसल्यामुळें जिच्यासंबंधानें **वत्सराजा**ला **दृढवर्म्यां**चें अगत्य लागावयाचें तीच नाहींशी झाली, तेव्हां **वत्सराजा**जवळ जाऊन कोणत्या तोंडानें हें रडगाणें गावें, असें वाटल्यावरून **दृढवर्म्यां**च्या प्रधानांनीं **वत्सराजा**ला विनंती केली नाहीं.

बायकोकडच्या नात्याच्या संबंधानें **वासवदत्तेचा** पिता **चंडमहासेन** याला **दृढवर्म्याचें** विशेष अगत्य होतें. म्हणून प्रधानमंडळी **चंडमहासेनाकडे** गेली. त्यांनीं कोणत्याही रीतीनें आपल्या धन्याला सोडविण्याविषयीं **चंडमहासेना**-ची प्रार्थना केली. **चंडमहासेन** हा मोठा शूर व बलाढ्य होता, तरी **कलिंगराजावर** स्वारी केली असतां तींत आपल्याला जयप्राप्ति होईल अशी त्याला खात्री नव्हती; म्हणून त्याबद्दल **वत्सराजाला** भर द्यावी असा त्यानें विचार केला. स्वतः आपण जांवयाला विनंति करावी, हें त्याच्या मानी स्वभावाला योग्य वाटलें नाहीं. त्यानें आपली **स्त्री अंगारवती** हिला सूचना केली, व त्याप्रमाणें **अंगारवतीनें** एका जासुदाच्या हातीं पत्र देऊन तें **वासवदत्ते**-कडे पाठविलें.

इकडे तें पत्र येण्याबरोबर **वासवदत्ता** फार घाबरी झाली. **वत्सराजाला** सांगून त्याच्याकडून **कलिंगराजाचा** पराभव करवून **दृढवर्म्याला** सोडवून घ्यावा, असें तिच्या मनांत आलें; पण पूर्वीं सांगितलेलें नाटक झालें, त्यादिवसापासून उभयतांत अबोला आला होता. तेव्हां राजाजवळ कसें सांगावें ह्या विचारांत ती पडली होती. शेवटीं **सांकृत्यायनी** मोठी पोक्त विचारी बायको आहे, तेव्हां तिच्या मतानें कांहीं तरी तजवीज करावी, असा तिनें विचार केला. ह्या नवरा बायकोचा अबोला आल्यापासून **सांकृत्यायनी** अगदीं अलग राहिली होती. ती दोघांतून कोणालाही भेटत नसे. आज **वासवदत्तेनें**, कसेंही करून तिला घेऊन ये, असें सांगून **कांचनमालेला** पाठविली होती. **कांचनमाला** आपल्याशींच म्हणाली, मी पुष्कळ

हुडकलें तरी भगवती **सांकृत्यायनी** कोठेंच भेटली नाहीं. तेव्हां आतां तिला कोठें तरी शोधावें ?

**मनोरमे**ला **कांचनमाला** भेटली हें वर सांगितलेंच आहे. तिच्याकडे पाहून **कांचनमाला** म्हणाली, 'होहो ! ही **मनोरमा** इकडेच येत आहे, तर आतां हिला विचारून पहावें. असा विचार करून **मनोरमे**ला ह्मणाली, 'अग **मनोरमे**, भगवति **सांकृत्यायनी** यावेळीं कोठें आहे तें तुला कांहीं माहीत आहे का?'

**कांचनमाले**कडे पाहून डोळ्यांतले अश्रु पुसून **मनोरमा** ह्मणाली, '**कांचनमाले**, काय ह्मणतेस ? भगवती **सांकृत्यायनी**ला का विचारतेस ? तिला मी पाहिली आहे; पण तिच्याशीं तुझें काय काम आहे?'

**कांचनमाला** ह्मणाली, 'गडे **मनोरमे**, बाई काय सांगावें? बाईसाहेबांची मातुश्री राणी **अंगारवती** हिणें त्यांना आज एक पत्र पाठविलें आहे. तें वाचलें मात्र, तों लगेच बाईसाहेबांच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागल्या. त्या फारच संतप्त झाल्या आहेत. तेव्हां घटकाभर त्यांच्या मनाची समजूत करण्याकरितां भगवती **सांकृत्यायनी**चा शोध करितें.

हें ऐकून **मनोरमा** ह्मणाली, 'अग, त्या पत्रांत असें काय लिहिलें होतें ?'

**कांचनमाला** ह्मणाली, 'आईसाहेबांनीं असें लिहिलें होतें कीं, जी माझी बहीण, ती तुला आईसारखीच आहे. तिचा भर्ता **दृढवर्मा**, हाही तुला वडिलांसमान आहे. तेव्हां आतां तुला अधिक काय लिहावयाचें आहे ? त्या मेल्या **कलिंगानें दृढवर्म्या**ला बंदिशाळेंत

घातलें, त्याला आज किती दिवस झाले, ती गोष्ट तुझ्या कानावर आलीच असेल. असें असून त्या **कलिंगाचें** पारिपत्य करण्याला समर्थ अशा आपल्या भर्त्याला सांगून **दृढवर्म्याला** सोडून घेण्याचा तूं अद्याप प्रयत्न करीत नाहींस, हें कांहीं चांगलें नव्हे.'

**अंगारवतीनें** पाठविलेलें पत्र प्रथम **वत्सराजाच्या** हातीं आलें होतें. त्यांतला **दृढवर्म्याच्या** संबंधाच्या मजकूर **वासवदत्तेला** कळला तर ती फारच दुःखित होईल, म्हणून तें पत्र राणीला कोणीही समग्र वाचून दाखवूं नये, अशी **राजानें** ताकीद दिली होती. ही गोष्ट **मनोरमेला** माहीत होती. म्हणून ती म्हणाली, 'अग **कांचनमाले,** तो मजकूर बाईसाहेबांला वाचून दाखवूं नये असें महाराजांनीं सांगितलें असून असें हें कसें झालें?'

**कांचनमाला** म्हणाली, 'महाराजांच्या हातीं तो लखोटा आला, तेव्हां त्यांनीं तो फोडून वाचून पाहिला, आणि बाईसाहेबांकडे पाठविला. तेव्हां त्यांनीं मला काय तें म्हणून वाचायास सांगितलें. महाराजांच्या आज्ञेप्रमाणें मीं बाकीचा सगळा मजकूर वाचला, आणि **दृढवर्म्याचा** संबंध येतांच उगी राहिलें. तेव्हां बाईसाहेबांला काय संशय आला कोणास ठाऊक? त्यांनीं लगेच तें पत्र माझ्या हातांतून हिसकून घेऊन आपणच वाचून पाहिलें.'

**कांचनमाला सांकृत्यायनीला** बोलावून आणायला गेली त्याला बराच वेळ झाला होता, व ती परत येण्यापूर्वीं, **सांकृत्यायनीला** दुसरीकडून राणी अस्वस्थ असल्याचें कळल्यावरून, ती तिच्या समाचाराला गेली हें **मनोरमेनें** पाहिलें होतें. म्हणून ती **कांचनमालेला**

म्हणाली, 'अग, तूं कशाला उगीच इकडे तिकडे शोधतेस ? सांकृत्यायनीआई आधींच बाईसाहेबांकडे गेल्या आहेत. जनानखान्याच्या सज्जावर दोघीही गोष्टी बोलत बसल्या आहेत.'

हें ऐकून कांचनमाला म्हणाली,'तर मग माझें आयतेंच काम झालें. मी आतां बाईसाहेबांकडेसच जातें.' असें बोलून ती तिकडे निघून गेली.

इकडे मनोरमा आपल्याशींच म्हणाली, माझी प्रियसखी आरण्यका फार दुःखित आहे. तिच्याकडून मी आलें त्याला फार वेळ झाला. ती बिचारी आपल्या जिवाला अगदीं कंटाळली आहे. तेव्हां कदाचित् भलतेंच कांहीं करून घेईल, याकरितां आपण तिकडेच जावें, असा विचार करून मनोरमा आरण्यकेकडे गेली.

इकडे सांकृत्यायनी आणि वासवदत्ता ह्या दोघी कांहीं बोलत बसल्या होत्या. सांकृत्यायनी तिला कांहीं समजुतीच्या गोष्टी सांगत होती. राजा पायां पडला असतांही आपण तिकडे लक्ष दिलें नाहीं, तेव्हां तो आपल्यावर फारच रागावला असेल, व त्याला आतां आपण सांगितलें तरी तो ऐकणार नाहीं, असें राणीला वाटत होतें; पण वस्तुतः तशी स्थिति नव्हती. कोणत्याही रीतीनें राणीला प्रसन्न करून घेऊन प्रियदर्शिकेची प्राप्ति व्हावी, हें राजाला मनापासून इष्ट होतें. व राणीची मर्जी प्रसन्न होण्याची आयतीच संधि प्राप्त झाल्याबद्दल तो सांप्रत विशेष खुषही झाला होता.

सांकृत्यायनी वासवदत्तेला म्हणाली, 'राजकन्ये, तूं अशी उद्विग्न होऊं नको; वत्सराज तसा नाहीं. तुझ्या

मावशीचा पति दृढवर्मा अशा वाईट स्थितींत आहे हें ऐकून वत्सराज कधींही निश्चित रहावयाचा नाहीं. त्यानें कांहींतरी तजवीज केलीच असेल, किंवा करण्याच्या तयारींत असेल, याविषयीं मला अगदीं संशय वाटत नाहीं.'

वासवदत्तेचे डोळे पाण्यानें भरून आले होते. ती म्हणाली, 'भगवति, तुम्ही तर अगदीं मला भोळ्या दिसतां. ज्याला स्वतः माझीच गरज नाहीं, त्याला माझ्या आप्तांची कोठून असणार? आईनें मला तसें लिहिलें तें तिचें ठीकच आहे. ती समजत असेल कीं, वासवदत्ता पहिल्यासारखी भोळी नसेल. नवरा आतां तिच्या अगदा हुकुमांत आला असेल. पण हिकडे काय चाललें आहे तें तिला बापडीला काय ठाऊक? त्या दिवशीं आरण्यकेच्या संबंधानें काय झालें, तें तुम्हीं पाहिलेंच आहे! असें असून तुम्ही या गोष्टी सांगतां, याला काय म्हणावें?'

सांकृत्यायनी म्हणाली, 'हो, मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे, म्हणूनच हें सांगतें. त्यानें, त्या दिवशीं कौमुदीमहोत्सव होता तेव्हां कांहीं तरी करून तुला हंसवावें, म्हणून तसें केलें असेल.'

वासवदत्ता म्हणाली, 'भगवति, हें मात्र खरें. त्यांनीं मला असें हंसविलें कीं, त्यापासून तुमच्यापुढें तोंड दाखवायाला मला अतिशय लाज वाटते! मी आपली डोळ्यावर कातडें आढून कशी तरी दिवस काढतें आहें. आणि हें म्हणजे नवीनच झालें आहे असें नाहीं; वरचेवर असे माझे धिंडवडे निघतच आहेत! रत्नावलीच्या वेळीं असेंच झालें होतें. असो; त्या गोष्टी बोलून

काय करावयाचें आहे ? ह्याच पक्षपातानें व भोळेपणानें मीं आपली अशी दशा करून घेतली आहे?" असें बोलून **वासवदत्ता** रडूं लागली.

तिचें समाधान करून **सांकृत्यायनी** म्हणाली, 'मुली, रडूं नको. ती **वत्सराज** तूं ह्मणतेस तसा नाहीं. तीं कांहीं तरी तजवीज केल्यावांचून कधींही राहाणार नाहीं.'

**वत्सराजाला** राणीचें समाधान करण्याला कांहींतरी सवड पाहिजेच होती. **दृढवर्म्याची** हकीकत त्याला ह्यापूर्वींच कळली होती, व त्याच्यावर स्वारी करून आपल्यामुळें संकटांत पडलेल्या त्याला सोडवावें, असें त्याच्या मनांत होतें; म्हणून तो तयारी करीत होता. थोड्या दिवसांपूर्वीं त्यानें **विजयसेनाला** बरोबर मोठी फौज देऊन **कलिंगराजावर** पाठविलें होतें, व तिकडून **विजयसेनाला** जय येत चालल्याची खबरही आली होती; तथापि ही गोष्ट राणीला सांगण्याचा प्रसंग आला नव्हता. **अंगारवतीचें** पत्र येतांच त्या निमित्तानें राणीचें समाधान करण्याची त्याला चांगली संधि मिळाली, व राणी यावेळीं फार दुःखित आहे असें समजून तो तिच्या समाचाराला गेला.

**सांकृत्यायनी** आणि **वासवदत्ता** यांचा वर सांगितल्याप्रमाणें संवाद चालला होता. इतक्यांत **वत्सराज** तिकडे येत आहे असें दुरून त्यांच्या दृष्टीस पडलें. त्याला पाहून **सांकृत्यायनी** ह्मणाली, 'तुझ्या रागाची शांति करणारा हा पहा इकडे आला.'

**वासवदत्ता** ह्मणाली, 'भगवति, हे तुमचे केवळ मनोरथ आहेत. काय होईल तें आतां दिसेलच.'

राजाबरोबर वसंतकही होता. त्याला तो ह्मणाला, 'मित्रा, प्रिय आरण्यकेला कैदेंतून सोडविण्याला यावेळीं कोणता उपाय करावा बरें ?'

वसंतक ह्मणाला, 'तूं विषाद सोड, आणि मी तुला उपाय सांगतों, तो कर ह्मणजे झालें.'

राजा आनंदानें ह्मणाला, 'गड्या, सांग सांग, लवकर सांग कोणता उपाय तो.'

वसंतक ह्मणाला, 'मित्रा, असें पहा कीं, मोठमोठ्या लढाया मारून तुझें अंग अगदीं शिणलें आहे. व तुझ्याजवळ हत्ती, घोडे, पायदळ यांनीं मिश्र अशी पुष्कळ फौज आहे. तेव्हां एकदम आपल्या सगळ्या फौजेला हुकूम करून जनानखान्याला वेढा दे, आणि जिकडे तिकडे बंदोबस्त करून आरण्यकेला आतांच सोडवून घे ह्मणजे झालें !'

हें ऐकून राजा हंसून ह्मणाला, 'वाहवा ! मोठा शहाणा आहेस खरा. अरे, आपल्या जनानखान्यावर आपणच फौज पाठवायची काय ! तूं ही फार अशक्य गोष्ट सांगितलीस.'

वसंतक हंसून ह्मणाला, 'अरे, त्यांत अशक्य तें काय ? ह्या जनानखान्यांत सारे कुबडे, ठेंगणे, ह्मातारे असेच लोक भरले आहेत. त्यांत तुझ्याशीं सामना करणारा असा कोणीच नाहीं. तेव्हां यावरून असें होण्यास कांहींच अशक्य नाहीं ?'

राजानें अशक्य ह्मटलें त्याचा हेतु निराळा असून वसंतकानें भलताच अर्थ केला. तो ऐकून राजा ह्मणाला, 'छत् ! मूर्ख कोठला. भलभलतेंच काय बडबडतोस ?

राणीला प्रसन्न करून घेतल्यावांचून तिची (आरण्यकेची) सुटका होण्याला दुसरा मार्गच नाहीं. याकरतां राणीला आतां कशी प्रसन्न करून घ्यावी तें सांग म्हणजे झालें.'

**वसंतक** म्हणाला, 'त्यांत काय मोठेंसें? एक महिनाभर उपोषणें करीत बैस म्हणजे झालें! म्हणजे ती तुझी रागीट देवी प्रसन्न होईल!'

**राजा** म्हणाला, 'थट्टा करूं नकोस. प्रसन्न करण्याचा उपाय काय तो सांग. मी धीटपणानें हंसत हंसत पुढें जाऊन, तिच्या गळ्याला मिठी मारूं, किंवा पुष्कळ गोड गोड बोलून तिला प्रसन्न करून घेऊं, किंवा तिच्या पायांवर कृतांजलि होऊन आपलें मस्तक ठेवूं, किंवा करूं तरी काय? खरोखर, ती कशी प्रसन्न होईल याचा मला कांहीं उपाय सुचत नाहीं! बरें असो; चल आतां देवीकडेसच जाऊं या.'

**आरण्यकेबरोबर वसंतकही** प्रतिबंधांत होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तो कैदेंत असतां आणा शपथा घेऊन व राणीचें आर्जव करून एकदांचा तेथून सुटला होता. तेव्हांपासून तो राणीच्या वाऱ्यास देखील उभा राहिला नव्हता. राजानें, तिच्या भेटीला जाऊं या, असें सांगितलें तें ऐकून तो म्हणाला, 'महाराज, आपणच तिकडे चला; मी कसातरी मोठ्या संकटानें एकदां बंधनांतून सुटलों. आतां पुनः मी राणीच्या वाऱ्याला देखील उभा राहणार नाहीं. मागचा पुढचा कांहीं तरी राग काढून तिनें पुनः मला कैदेंत टाकलें, तर मग काय करावें?'

**राजा** हंसून त्याच्या गळ्यांत हात घालून म्हणा-

ला, 'चल, मूर्ख कोठला ! उगीच कां भितोस ? मी तुझ्या बरोबर असतां तुला कोणाचें भय आहे ?' असें बोलून वसंतकाला बळजबरीनें आपल्या बरोबर घेऊन गेला.

राणी समोरच सज्जांत बसली होती, तिला पाहून म्हणाला, 'चल चल लवकर, ही पहा राणी येथें बसली आहे.' असें बोलत राणीच्या जवळ प्राप्त झाला. वासवदत्ता रागांत होती तरी राजावर तिचें फारच प्रेम होतें. त्याला पहातांच ती तत्काल उठून उभी राहिली.

तें पाहून राजा म्हणाला, 'मला पाहून कां उठलीस ? इतके श्रम घेण्याचें कांहीं कारण नाहीं. केवळ प्रेमदृष्टीनें पाहण्याचा अनुग्रह केला, म्हणजे तेवढ्यानेंच आम्ही संतुष्ट होतों. असें असून हा अतिशय आदर करून आम्हांस खजील कां करतेस ?'

वासवदत्तेनें राजाच्या तोंडाकडे पाहिलें तों त्याची आनंदित मुद्रा दिसली, तेव्हां ती म्हणाली, 'आर्यपुत्रा, आपण बरे खजील व्हाल ?'

राजा म्हणाला, 'प्रिये, मी खरोखरच खजील झालों आहें. माझा अपराध त्वां प्रत्यक्ष पाहिला असून, मी तुला प्रसन्न करून घेण्याचा विचार करितों याची मला मोठी लाज वाटते.'

सर्व मंडळी उभी असून, या नवरात्रायकोंचा संवाद लवकर आटपायाचा नाहीं, म्हणून सांकृत्यायनी, वासवदत्ता ज्या आसनावर बसली होती त्याच्याकडे बोट दाखवून म्हणाली, 'महाराज, आधीं ह्या आसनावर बसावें.'

राजा आसनाकडे हात करून वासवदत्तेला म्हणाला, 'देवि, अशी ह्यावर बैस.'

वासवदत्तेनें हें मुळींच ऐकिलें नाहीं. रागारागानें ती जमिनीवरच बसली, हें पाहून राजा म्हणाला, 'वाः! तूं जमिनीवर बसलीस काय? बरें तर मीही येथेंच बसतों,' असें बोलून राजा हात जोडून तिच्यापुढें बसून म्हणाला, 'प्रिये, प्रसन्न हो प्रसन्न हो; मी अशीं आर्जवें करीत असतां फारच रागावतेस हें काय? हे मृगनयने, तूं वरचेवर केवळ रडत आहेस. भिवयांचे चाळे मुळींच करीत नाहींस. तुझा अधरोष्ठ स्फुरण पावत नाहीं, आणि सुस्कारे मात्र सोडतेस. एक शब्ददेखील बोलत नाहींस, आणि चिंताक्रांत होऊन मान खालीं घालतेस. हा तुझा आंवरलेला कोप गुप्त प्रहारासारखा मला पीडा करतो; तर एकदांचा राग सोडून माझ्याशीं बोल बरें;' असें म्हणून राजा तिच्या पायां पडला.

वासवदत्ता म्हणाली, 'आपण खुशाल आनंदांत आहां, आणि दुःखानें पोळलेली जी मी त्या मला उगीच कां पुनः पुनः कष्टी करतां? उठा, कोण येथें रागावलें आहे? आणि राग करायचा तरी कोणावर?'

सांकृत्यायनीला मध्यें तोंड घालण्याला ही चांगली संधि मिळाली. ती म्हणाली, 'महाराज, उठा, उठा, असें करून काय उपयोग? हिला दुःख होण्याचें कारण कांहीं निराळेंच आहे.'

हें ऐकून राजा गडबडीनें तत्काळ उठून म्हणाला, 'भगवति, दुसरें कोणतें कारण बरें?'

सांकृत्यायनीनें उघड न सांगतां, अंगारवतीकडून आलेल्या पत्रांतली हकीकत राजाच्या कानांत सांगितली. ती ऐकून तो हंसून म्हणाला, 'हात्तेच्या! हेंच

का दुःखाचें कारण? हेंच असेल तर त्याबद्दल इतकें उद्विग्न व्हायला नको. ती गोष्ट मला आधींच ठाऊक होती. बहुतकरून तें आमचें काम झाल्यासारखेंच आहे. तिकडून पुरती खबर आली, म्हणजे ती सांगून राणीला खुष करावी, असें माझ्या मनांत आहे, म्हणून मी दम खाल्ला. नाहींतर **दृढवर्म्याची** गोष्ट ऐकून मी इतका गाफल कसा राहीन? नुकतीच तिकडून खबर आली आहे कीं, आमचा मुख्य सरदार **विजयसेन** याच्या फौजेनें बाहेरचा सर्व प्रदेश व्यापून त्या **कलिंगाला** अगदीं जर्जर केलें. सांप्रत तो किल्ल्यांत शिरून आपला बचाव करून घेत आहे.'

तो किल्ल्यांत शिरला, तरी आमच्या सैन्यानें त्याची पाठ सोडली नाहीं. दर दिवशीं आमच्याकडचे लोक किल्ल्यावर हल्ला करून त्याचा नाश करण्याचा प्रयत्न करीतच आहेत. व हत्ती, घोडे, पायदळ वगैरे जी कांहीं त्याची फौज मिळेल, ती प्रतिदिवशीं ते क्षीण करीत आहेत. किल्ला पाडण्याचा तर उद्योग चाललाच आहे. बहुतकरून आज किंवा उद्यां इतक्यांत किल्ल्याचा फडशा पाडून आमची फौज विजयी होईल, व त्या दुष्टाला मारलें किंवा कैद केलें, या दोहोंतून एक वर्तमान आमच्या कानावर येईल.'

राजाचें हें बोलणें ऐकून **सांकृत्यायनी वासवदत्तेला** म्हणाली, 'कां, मी तुला आधींच सांगितलें होतें कीं नाहीं, कीं **दृढवर्म्याला** सोडविण्याचा उपाय केल्यावांचून महाराज कधीं राहणार नाहींत ह्मणून?'

**राजा** आपलें सांगणें ऐकेल कीं नाहीं, याविषयींचा

जिला संशय होता, तिला, आपण न सांगतां त्यानें इतकी तजवीज केली, हें ऐकून किती आनंद झाला असेल बरें! **वासवदत्ता** ह्मणाली, 'असें झालें असेल तर माझें मोठें प्रिय होईल!'

केव्हां केव्हां कांहीं योगायोग मोठ्या चमत्कारिक रीतीनें घडून येतात. **वत्सराज** राणीला असें सांगत आहे इतक्यांत, **कलिंगराजाला** मारून **दृढवर्म्याला** आपल्या राज्यावर बसवून **विजयसेन** परत आला. बाकीची सर्व फौज मागेंच होती. एकटा **विजयसेन दृढवर्म्याचा** चोपदार यालां बरोबर घेऊन, **राजाला** हें आनंदाचें वर्तमान सांगण्याकरितां पुढें आला होता. त्यानें बाहेर उभें राहून **राजाला** आपण आल्याची खबर देण्यास सांगितल्यावरून, चोपदारीण आंत येऊन **राजाला** मुजरा करून ह्मणाली, 'सरकार, हा **विजयसेन दृढवर्मा** महाराजांच्या चोपदारासह बाहेर उभा आहे. तो मोठ्या आनंदित मुद्रेनें—महाराजांना आनंदाची खबर सांगणार, असें ह्मणतो.'

चोपदारणीचें हें भाषण ऐकून **वासवदत्ता** हंसून **सांकृत्यायनीला** ह्मणाली, 'भगवति, ती (चोपदारीण) काय सांगते आहे, त्यावरून आर्यपुत्रानें खरोखर मला संतोष होण्यासारखें केलें असावें असें वाटतें!'

**सांकृत्यायनी** ह्मणाली, 'मी वत्सराजाच्या पक्षाची आहें, तेव्हां यासंबंधानें मी कांहीं एक बोलणार नाहीं.'

चोपदारणीची विनंती ऐकून **राजा** तिला ह्मणाला, 'जा जा, लवकर त्याला आंत घेऊन ये.'

**राजाचा** हुकूम होतांच चोपदारीण बाहेर जाऊन,

विजयसेन व त्याच्याबरोबर आलेला दृढवर्म्याचा चोपदार, विनयवसु यांना आंत घेऊन आलो. विजयसेन यावेळीं मोठ्या आनंदांत होता. तो विनयवसूला ह्मणाला, 'आर्या विनयवसो, आज महाराजांच्या चरणकमलांचें दर्शन व्हायाचें आहे, ह्मणून खरोखर मला कांहीं अनुपम सुखाचा अनुभव होत आहे !'

विनयवसु ह्मणाला, 'शूरा विजयसेना, तूं ह्मणतोस तें अगदीं खरें आहे. असें पहा कीं, एरवीं देखील आपल्या धन्याला पाहून तुझ्यासारखे स्वामिभक्त सेवक फार खुष होत असतात, मग यजमानानें मोहिमेवर पाठविलें असून तेथें शत्रुसैन्याचा पराभव करून ज्यानें धन्याची आज्ञा पूर्ण केली असेल, त्याला विशेष सुख होईल यांत काय आश्चर्य आहे?'

असें बोलत दोघेही राजाच्या जवळ गेले, व त्यांनीं मोठ्या नम्रतेनें त्याला मुजरा केला.

राजानें विजयी झालेल्या त्या आपल्या सरदाराला प्रेमानें आलिंगनाची भेट देऊन त्याचा सन्मान केला व त्याबरोबरच ह्मातान्या विनयवसूलाही त्याचा लाभ मिळाला. नंतर विनयवसु राजाला ह्मणाला, 'महाराज, सर्व प्रकारें आपला उत्कर्ष झाला आहे. ह्या शूर विजयसेनानें त्या दुष्ट कलिंगाला मारून आमच्या यजमानांला पुनः राज्यावर बसविलें. याप्रमाणें आपला हुकूम ह्या विजयसेनानें उत्तम प्रकारें बजाविला.'

चोपदार विनयवसु हा वासवदत्तेच्या ओळखीचा होता. कारण प्रियदर्शिकेची आई, अर्थात् वासवदत्तेची मावशी, राणी अंगारवतीला क्षेमसमाचाराचीं पत्रें वरचेवर

याच्या हातींच पाठवीत असे, यामुळें माहेरीं असतां **वासवदत्ते**ला व **सांकृत्यायनी**लाही पुष्कळ वेळ त्याला पाहण्याचा प्रसंग आला होता. यामुळें चोपदाराला ओळखून **वासवदत्ता सांकृत्यायनी**ला म्हणाली, 'भगवति, ह्या चोपदाराला तुह्मी ओळखलें का?'

**सांकृत्यायनी** ह्मणाली, 'कां ओळखणार नाहीं? वरचेवर तुझी मावशी तुझ्या आईला याच्याच हातीं पत्रें पाठवीत होती तें मला माहीत नाहीं का?'

**राजा** मोठा खुष होऊन **विजयसेना**ला ह्मणाला, 'शाबास, **विजयसेना** शाबास! आज तूं मोठेंच काम केलेंस!'

**वत्सराज** सर्वप्रकारें मोठा दैवशाली होता. त्याला कामदार मिळाले होते, ते देखील आपल्या धन्याची इमानें इतबारें चाकरी करणारे असून त्याच्यावर अत्यंत अनुरक्त, निराभिमानी, व एकनिष्ठ होते. वस्तुतः यावेळीं **विजयसेनानें** जी कामगिरी केली होती, तीबद्दल त्याला खरोखर मोठा अभिमान वाटला पाहिजे होता. पण त्या इमानी सरदारानें, राजानें त्याची इतकी स्तुति केली तरी, तीबद्दल बिलकुल ताठा न बाळगतां त्यानें राजाच्या पायांवर मस्तक ठेविलें, आणि ह्मणाला, 'हा सर्व सरकारच्या पायांचा प्रताप आहे!'

**राजा वासवदत्ते**ला म्हणाला, 'देवि, दैवानें तुझा मोठा उत्कर्ष केला आहे. **दृढवर्मा** पुनः आपल्या राज्यावर आरूढ झाला बरें.'

**वासवदत्ता** आनंदित होऊन म्हणाली, 'सर्वप्रकारें मजवर मोठा अनुग्रह झाला आहे.'

याप्रमाणें, राणीला कशी प्रसन्न करावी याविषयीं राजाला जी मोठी काळजी होती, ती निवृत्त झाली. राणी सर्वप्रकारें राजाची मोठी मिंधी झाली, तेव्हां आतां आरण्यकेची सुटका करवून युक्तीनें ती राजाला देवविण्याची ही उत्तम संधि आहे असें समजून, वसंतकानें ती वायां जाऊं दिली नाहीं. तो म्हणाला, 'वाहवा! आज तर या राजदरबारांत जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला आहे. तेव्हां अशा प्रसंगीं तीन गोष्टी अवश्य अवश्य झाल्याच पाहिजेत. त्या कोणत्या म्हणाल, तर सांगतों.' राजाकडे बोट दाखवून बीन वाजविल्यासारखें करून म्हणाला, 'गुरूची पूजा, (आपलें जानवें हातांत धरून) ब्राम्हणाचा सत्कार, (आरण्यकेची सूचना करून) सर्व कैद्यांला बंदिशाळेंतून सोडविणें, ह्या तीन गोष्टी न झाल्या तर मग काय?'

वसंतकानें, आपल्या मनांत होतें, तेंच योग्य वेळीं सांगितल्यावरून अत्यंत खुष होऊन राजानें वासवदत्तेच्या नकळत वसंतकाच्या हातावर टाळी दिली, व हळूच त्याला म्हणाला, 'गड्या फार छानदार बोललास.'

वसंतक राणीला म्हणाला, 'बाईसाहेब, मी बोललों त्याच्यावर आपण कांहींच उत्तर दिलें नाहीं हें काय?'

हें ऐकून वासवदत्ता सांकृत्यायनीच्या तोंडाकडे पाहून म्हणाली, 'मेल्या चाहटळानें कशी संधि साधली पहा! यावेळीं आरण्यकेला यानें सोडवून घेतली.'

सांकृत्यायनी म्हणाली, 'त्या बिचाऱ्या अनाथ पोरीला बंधनांत ठेवून तुला तरी काय करायचें आहे?'

**वासवदत्ता** म्हणाली, ‘ यावेळीं मी कांहीं विरुद्ध बोलणार नाहीं, तुम्हांला वाटेल तसें करा.’

**वासवदत्तेच्या** तोंडांतून हे शब्द निघतांच **सांकृत्यायनी** ह्मणाली, ‘ असें असेल तर स्वतः मीच जाऊन तिला सोडवून आणतें,’ असें सांगून ती तिकडे गेली.

**विनयवसु** राजाला म्हणाला, ‘ आमच्या महाराजांनीं एक निरोप सांगितला आहे. ते म्हणाले, प्रिय जांवयाला अशी विनंती कर कीं, तुमच्या कृपेनें आमच्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्या. आतां हे आमचे प्राण तुमच्या हातीं दिले आहेत, यांचा पाहिजे तसा विनियोग करण्याविषयीं तुमचा अधिकार आहे ! ’

**दृढवर्मा** शौर्यानें किंवा इतर गुणांनीं कमी असला, तरी तो वयानें व नात्यानें **वत्सराजा**पेक्षां फार मोठ्या योग्यतेचा होता. त्यानें इतक्या नम्रतेचा निरोप पाठविला तो ऐकून राजाला अंमळ लाज वाटली, व त्यानें तोंड खालीं घातलें. तें पाहून **विजयसेन** म्हणाला, ‘ महाराज, **दृढवर्म**राजाचा सरकारांवर किती लोभ आहे याचें मला वर्णन देखील करतां येत नाहीं.’

चोपदार **विनयवसु** पुनः म्हणाला, ‘ आणखी आमच्या महाराजांनीं असें सांगितलें आहे कीं, यद्यपि, माझी मुलगी **प्रियदर्शिका** तुम्हांला देऊन नातें जोडावें असें माझ्या मनांत होतें, व दुर्दैवानें ती नाहींशी झाल्यामुळें तो योग घडून आला नाहीं, म्हणून मी फार दुःखी होतों, तथापि **वासवदत्तेशीं** आपण विवाह केला त्यायोगानें तें आमचें नातें कायमच आहे असें मी समजतों.’

वस्तुतः **प्रियदर्शिका** राजाजवळच होती. तरी को-

णालाच तिची ओळख नसल्यामुळें ती कोणाची कोण, हें कांहीं ठाऊक नव्हतें. चोपदाराचें भाषण ऐकून **वासवदत्ता** डोळ्यांत पाणी आणून म्हणाली, 'आर्या **विनयवसो**, ती माझी बहिण **प्रियदर्शिका** कशी नाहींशी झाली ?'

**विनयवसु** म्हणाला, 'राजकन्ये, काय सांगूं ! त्या दुष्ट **कलिंगानें** हल्ला केला त्यावेळीं जनानखान्याची अगदीं वाताहत झाली, तेव्हां, ती मुलगी त्या दुष्टाच्या हातीं लागली नाहीं तोंपर्यंत, आपण तिला इकडे आणावी, असा विचार करून मीं तिला तेथून पळविलें. नंतर विचार करून, **विंध्यकेतु** हा आमच्या महाराजांचा मित्र आहे असें समजून, त्याच्या येथें तिला ठेवून मी दुसरीकडे गेलों, व लवकरच परत येऊन पहातों तों तें **विंध्यकेतूचें** स्थान, कोणी त्याच्यावर छापा घालून, केवळ नांव मात्र अवशिष्ट राहील असें केलें !'

ही गोष्ट **राजाच्या** माहितींतली होती. तो हंसून **विजयसेनाकडे** पाहून म्हणाला, 'अरे, हा काय म्हणतो तें ऐकलेंसना ?'

चोपदार म्हणाला, 'मी त्या **विंध्यकेतूचें** सर्व स्थान शोधून पाहिलें, पण तिचा कोठें पत्ता लागला नाहीं. म्हणून तेव्हांपासून हावेळपर्यंत मी शोधीत आहें; पण ती कोठें आहे हें कांहीं समजत नाहीं.'

**सांकृत्यायनी आरण्यकेला** सोडवून आणण्याकरितां गेली होती हें वर सांगितलेंच आहे. ती तेथें पोंचण्यापूर्वींच **आरण्यकेनें** मद्य आहे असें समजून विष प्राशन केलें होतें, व नुकतेंच तें तिच्या अंगांत चढूं लागलें होतें. तें पाहून **मनोरमा**

धाबऱ्यां धाबऱ्यां **वासवदत्ते**कडे येऊन ह्मणाली, 'बाई-साहेब, ती बिचारी मरते कीं वांचते अशी झाली आहे!'

या वेळीं **वासवदत्ते**ला **प्रियदर्शिके**चें ध्यान लागलें होतें, तेव्हां **मनोरमा** तिचीच खबर सांगत आहे असें समजून, ती दुःखित होऊन ह्मणाली, 'अग काय! **प्रियदर्शिके**चें का वर्तमान सांगतेस?'

**मनोरमा** म्हणाली, 'नाहीं नाहीं. मला तिची कांहींच हकीकत माहीत नाहीं. ही आपली **आरण्यका**, ती ज्या ठिकाणीं आहे, तेथें कांहीं कारणाकरितां विष ठेविलें होतें, तें मद्यच आहे असें समजून ती तें प्याली, व त्यामुळें सांप्रत अगदीं मरणाच्या पंथास लागली आहे, असें मी सांगितलें; तर बाईसाहेब तिचें रक्षण करा!'

हें ऐकून **वासवदत्ता** मनांत म्हणाली, 'अरेरे! **आरण्यके**च्या ह्या हकीकतीनें मला **प्रियदर्शिके**चें देखील विस्मरण झालें. लोक मोठे दुर्जन आहेत. बिचारी आपल्याच कर्मानें मेली, तरी लोक माझ्यावर आरोप ठेवतील. तेव्हां कोणत्याही रीतीनें तिला उतारा* पडेल असें केलें पाहिजे.' ती **मनोरमे**ला म्हणाली, 'अग, जा जा, लवकर जाऊन तिला इकडेच घेऊन ये. आर्यपुत्रांना विषाचा उतारा माहीत असून ते या कामांत फार कुशल आहेत.'

---

* वत्सराज उदयपर्वतावर असतां त्याला एक नाग प्रसन्न झाला होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्या नागानें त्याला विषविद्या दिली होती, व तीमुळें तो पाहिजे त्या विषावर तत्काळ उतारा देत असे.

याप्रमाणें राणीचा हुकूम होतांच, **मनोरमा**, दुसऱ्या दोन दासी साह्यास घेऊन, **आरण्यके**ला राणीजवळ उचलून घेऊन आली. **आरण्यके**च्या अंगांत विषाचा बराच संचार झाला होता. तिचे डोळे तारवटले असून अंधारी येत होती व चित्त ठिकाणावर नव्हतें.

**मनोरमे**नें **आरण्यके**ला राणीच्या जवळ आणून बसविली, तेव्हां ती म्हणाली, 'अग ए! कोण ग तूं? हंहं **मनोरमे**, मला यावेळीं अंधारांत कां कोंडते आहेस?'

तिचें तें भ्रमिष्टासारखें बोलणें ऐकून **मनोरमा** दुःखित होऊन म्हणाली, 'अरेरे! हिच्या दृष्टींत देखील विषाचा संचार झालासें वाटतें!'

**वासवदत्ते**ला म्हणाली, 'बाईसाहेब, लवकर कांहीं तरी उपाय करा. विष हिच्या अंगांत भिनतें आहे.'

**वासवदत्ता** गडबडीनें **राजा**चा हात धरून म्हणाली, 'आयपुत्र, उठा उठा लवकर. ही बिचारी अनाथ मुलगी मरते आहे.'

हें ऐकून सारेजण त्या मुलीकडे पाहूं लागले. चोपदार **विनयवसु आरण्यके**ला पाहून म्हणाला, 'आमच्या महाराजांची कन्या **प्रियदर्शिका**, हिच्यासारखेंच हिचें रूप आहे.' **वासवदत्ते**ला ह्मणाला, राजपुत्रि, ही कोणाची मुलगी हें तुला कांहीं ठाऊक आहे का?'

**वासवदत्ता** म्हणाली, 'आर्या, ती **विंध्यकेतू**ची मुलगी; त्याला मारून **विजयसेना**नें तिला इकडे आणलें.'

**विनयवसूला विंध्यकेतू**ची विशेष माहिती होती. कारण, तो त्याच्या घरीं **प्रियदर्शिके**ला घेऊन बरेच दिवस राहिला होता. **विंध्यकेतू**ला मुलगी मुळींच नव्हती

हें त्याला पक्कें ठाऊक होतें. **प्रियदर्शिका** त्याच्याच येथें नाहींशी झाली होती, स्वरूपही तसेंच दिसत होतें, ह्मणून चोपदार कपाळाला हात लावून म्हणाला, 'बिचाऱ्या **विंध्यकेतू**ला कोठली मुलगी असणार! आमच्या महाराजांची कन्या **प्रियदर्शिका** तीच ही. माझें कपाळ फुटलें म्हणून मी अशा अवस्थेंत तिला पहातों आहें!' असें बोलत असतां त्याला मूर्च्छा आली. लोकांनीं सावध केल्यावर तो **वासवदत्ते**ला म्हणाला, 'राजकन्ये, तीच ही **प्रियदर्शिका** तुझी बहीण!'

**वासवदत्ता** हावेळपर्यंत **प्रियदर्शिके**ला सावध करण्याविषयीं प्रयत्न करीत होती, व तिच्या त्या स्थितीबद्दल तिला फार वाईटही वाटत होतें. पण तें केवळ, तिचा नैसर्गिक दयाळू स्वभाव व लोकापवादाचें भय, यामुळेंच होतें. पण आतां ती आपली बहीण असें समजल्यावरून, तिची मनोवृत्ति निराळ्या प्रकारची झाली. ती **राजाच्या** पायां पडून म्हणाली, 'आर्यपुत्र, माझी बहीण मरते आहे, कृपा करून तिला वांचवा!'

**राजा वासवदत्तेचें** समाधान करून म्हणाला, 'अशी घाबरी होऊं नको, कांहीं प्रयत्न करून पाहूंया.' **प्रियदर्शिके**ला पाहून म्हणाला, 'अरेरे! फुलाच्या कळींत अमृतरस हळुहळु भरला आहे असें पाहून भ्रमर त्याचें प्राशन करायाला गेला, तों इतक्यांत एकाएकीं बर्फ पडून ती कळीच गळून गेली! एकंदरींत दैव प्रतिकूळ असलें म्हणजे कोणतीही क्रिया सफल होत नाहीं.' **मनोरमे**ला म्हणाला, 'अग **मनोरमे**, तिला एकदां विचार तरी, कीं तुला कांहीं आठवतें का ह्मणून.'

**मनोरमा** **प्रियदर्शिके**ला म्हणाली, 'सखे **प्रियदर्शिके**, तुला कांहीं आठवतें का ?' ती बोलत नाहीं असें पाहून तिला हालवून डोळ्यांत अश्रु आणून म्हणाली, 'अग, तुला कांहीं आठवण आहे का म्हणून मी विचारतें, तर माझ्याशीं कांहींतरी बोल.'

**प्रियदर्शिका** डोळे न उघडतां अडखळत अडखळत ह्मणाली, 'मी अशा अवस्थेंत असतां देखील महाराज माझ्या दृष्टीस पडले नाहींत!' असें अर्धेंच बोलून धाड-कन् भूमीवर पडली.

ही तिची स्थिति पाहून **राजाचे** डोळे पाण्यानें भरून आले. तो ह्मणाला, 'ही आपले डोळे झांकते आहे; पण त्यायोगानें मला सर्व दिशा अंधकारमय झाल्या आहेत. हिची जीभ आंत ओढते आहे, पण त्यामुळें माझ्या तोंडांतून शब्द निघायाला मोठा प्रयास पडतो आहे. हिचे श्वासोच्छ्वास बंद झाले, पण त्याच्यायोगानें माझें शरीर अगदीं निचेष्ट झालें आहे. हिला केवळ विषाच्याच लहरी येत आहेत, पण मला सर्वच दुःखमय झालें आहे!'

**वासवदत्ता** रडत रडत **प्रियदर्शिके**ला ह्मणाली, 'प्रियबहिणी **प्रियदर्शिके**, ऊठ ऊठ, हे पहा महाराज तुझ्याजवळ बसले आहेत. मी न जाणून तुझा मोठा अपराध केला आहे, त्याबद्दल रागावून तूं माझ्याशीं बोलत नाहींस हें काय! क्षमा कर, क्षमा कर, आतां ऊठ लवकर मी पुनः कधींही असा तुझा अपराध करणार नाहीं.'

**प्रियदर्शिके**च्या अंगांत विषाचा अधिक संचार झाल्यामुळें **लवकरच** तिची हालचाल बंद झाली, तें

पाहून **वासवदत्ता** दैवाला उद्देशून म्हणाली, 'मेल्या दैवा! असा काय मी तुझा अपराध केला होता, कीं ज्यामुळें तूं मला अशा अवस्थेंत ह्या बहिणीचें दर्शन घडविलेंस!' असें बोलून **वासवदत्ता प्रियदर्शिकेच्या** अंगावर पडली.

**राजा**ला विषविद्या माहीत होती, तरी त्याचें चित्त ठिकाणावर नसल्यामुळें आतां काय करावें हें त्याला सुचेनासें झालें. तें पाहून **वसंतक** म्हणाला, 'मित्रा, तूं असा वेड्यासारखा पहात काय उभा राहिला आहेस? उगाच विषाद करीत बसण्याची ही वेळ नव्हे. विषाचा प्रभाव मोठा विलक्षण आहे, तर यावेळीं आपल्या विषविद्येचें सामर्थ्य काय तें दाखीव.'

हें ऐकून **राजा** म्हणाला, 'गड्या, खरें सांगितलेंस. हावेळपर्यंत मी अगदीं मूढ झालों होतों. हा पहा मी हिला आतां जिवंत करतों. अरे, कोणीतरी थोडेंसें पाणी लवकर घेऊन या.'

हें ऐकून **वसंतक** चटकन् बाहेर जाऊन पाणी घेऊन आला. तेव्हां **राजा** डोळ्यांना पाणी लावून व **प्रियदर्शिके**च्या अंगावर थोडेंसें शिंपडून, तिच्या हृदयावर हात ठेवून मंत्र जपूं लागला. मंत्राची सुरवात होतांच **प्रियदर्शिका** हळूहळू सावध होऊन थोडक्याच अवकाशांत, आपल्या आपण उठून बसली. हें पाहून सर्वांला अतिशय आनंद झाला.

**वासवदत्ता** हर्षानें म्हणाली, 'आर्यपुत्र, माझ्या बहिणीला आपण जीवदान दिलें याबद्दल मी आपली ऋणी आहें.'

**विजयसेन** म्हणाला, 'वाहवा! विद्या असावी तर अशी. महाराजांच्या विद्येचा प्रभाव मोठा विलक्षण आहे.'

**विनयवसु** म्हणाला, 'वाः राजसत्ता असावी तर अशी. सर्वत्र आपल्या सत्तेची गति अकुंठित आहे!'

**प्रियदर्शिका** निजून उठल्यासारखी जांभया देत **मनोरमे**ला म्हणाली, 'गडे, मी फार वेळ निजलें होतें.'

**वसंतक** हंसत हंसत **राजा**ला म्हणाला, 'अहो वैद्यबुवा, धन्य आहे तुमची. एकंदरींत तुम्ही आपला वैद्यपणा पुरता दाखविलात.'

**प्रियदर्शिका** विषाच्या कैफांत होती, यामुळें तिला आपल्या स्थितीचें कांहींच भान नव्हतें, व आपल्याला कोणीं जिवंत केलें हें देखील तिला ठाऊक नव्हतें. **वसंतका**नें **राजा**ला वैद्यबुवा म्हटलें, तेव्हां—**राजा**नें आपणाला जिवंत केलें, असें तिला समजल्यामुळें, अभिलाषयुक्त दृष्टीनें **राजा**कडे पाहून लाजेनें तिनें मान खालीं घातली. हें पाहून **वासवदत्ता** हंसत **राजा**ला म्हणाली, 'आर्यपुत्र, अजून देखील ही असे कांहीं चमत्कारिक चाळे करते हें काय?'

राणीनें कोणत्या हेतूनें विचारलें तें **राजा**च्या लक्षांत येऊन त्याला हंसूं आलें. तो म्हणाला, 'तिची दृष्टि अद्याप पहिल्यासारखी झाली नाहीं. तोंडावाटे शब्द स्पष्ट निघत नाहीं. अंग दुखतें आहे, व घाम येऊन रोमांच ताठले आहेत. स्तनांच्या भारानें क्लेश देणारा कंपही हृदयांत आहे. यावरून अद्याप विषाची बाधा पुरती शांत झाली नाहीं असें वाटतें.'

इतक्यांत चोपदार **विनयवसु** **प्रियदर्शिके**च्या जवळ

येऊन, 'राजपुत्रि, हा तुझ्या बापाचा चाकर **विनयवसु** तुला नमस्कार करीत आहे', असें बोलून **विनयवसु** तिच्या पायांवर पडला.

**प्रियदर्शिका** **विनयवसू**ला ओळखून ह्मणाली, 'आर्या, **विनयवसो**, तूं इकडे कोठें आलास? आणि माझी आई व बाबा कोठें आहेत?'

**विनयवसु** तिचें समाधान करून म्हणाला, 'राजकन्ये, रडूं नकोस. तुझीं आईबापें खुशाल आहेत, आणि **वत्सराजा**च्या प्रभावानें त्यांचें राज्य वगैरे सर्व पहिल्यासारखें यथास्थित आहे.'

**वासवदत्ता** प्रेमाश्रुभरित नेत्रांनीं **प्रियदर्शिके**कडे पाहून म्हणाली, 'प्रियभगिनि, अग अशी हिकडे ये. किती तरी तूं लबाड आहेस. आतां तरी बहिणीला स्नेह दाखीव.' असें बोलून **वासवदत्ता** तिला आपल्या गळ्याशीं धरून म्हणाली, 'आतां मात्र माझा जीव स्वस्थ झाला!'

**वसंतक** हंसत हंसत राणीला ह्मणाला, 'बाईसाहेब, तुमचें ठीकच आहे. तुह्मी आपल्या बहिणीला पोटाशीं धरून खुशाल आनंदसमुद्रांत गटंगळ्या खात आहां; पण ह्या वैद्यबुवांची कांहीं आठवण आहे कीं नाहीं! यांना कांहीं तरीं बक्षीस द्या.'

हें ऐकून राणी ह्मणाली, '**वसंतका**, मी विसरलें नाहीं बरें का!'

**वसंतक** **राजा**कडे पाहून हंसून ह्मणाला, 'वैद्यबुवा, हूं, करा हात पुढें. मी तुह्मांला बाईसाहेबांकडून त्यांच्या बहिणीचा हात बक्षिस देववितों.'

हें ऐकून **राजानें** हात पसरला, तेव्हां **वासवदत्तेनें** **प्रियदर्शिकेचा** हात त्याच्या हातांत दिला.

**राजाला** **प्रियदर्शिकेची** प्राप्ति होण्याविषयीं किती उत्कंठा होती हें येथें पुनः सांगावयास नको; तरी राणीचें त्याला भय वाटत होतें. व ती कदाचित् रागानेंच असें करीत असेल असें समजून तो आपला हात चटकन् मागें घेऊन ह्मणाला, 'हिला ( **प्रियदर्शिकेला** ) घेऊन मला काय करावयाचें आहे? मोठ्या प्रयासानें नुकतीच ही ( **वासवदत्ता** ) प्रसन्न झाली आहे आणि आतां पुनः कांहीं अपराध केला तर मग काय होईल कोणास ठाऊक.'

**राजाचें** मन **प्रियदर्शिकेवर** गेलें त्याचें राणीला फार वाईट वाटलें होतें, तरी ती आपली बहीण हें राणीला माहीत नव्हतें, ह्मणून तिला राग आला होता; पण सांप्रत तिला नातें माहीत झाल्यामुळें ती मनापासून **प्रियदर्शिका** **राजाला** देण्यास तयार झाली होती. **राजानें** हात मागें घेतला, तेव्हां ती ह्मणाली, 'आतां तुह्मी कसें नाहीं ह्मणतां? आधींच हिला हिच्या बापानें तुह्मांला दिली आहे.'

**राजाच्या** मनांत **प्रियदर्शिका** मिळावी असें होतेंच, तरी तो उगीच ओढून ताणून चंद्रबळ आणीत होता. राणीनें पुष्कळसा आग्रह करावा आणि मग आपण तिचा स्वीकार करावा, असें त्याच्या मनांत होतें. **वसंतक** त्याचा अभिप्राय जाणून ह्मणाला, 'मित्रा, असें काय करतोस? राणीला अवश्य मान द्यावा. हिचें सांगणें मोडूं नको. ती बक्षीस देत आहे तें मुकाट्यानें घे.'

**राजा** हात पुढें करीना, तेव्हां **वासवदत्तेनें** बळजब-

रीनें त्याचा हात ओढून घेऊन **प्रियदर्शिके**चा हात त्याच्या हातांत दिला; तेव्हां तो हंसून मोठ्या खुषीनें ह्मणाला, 'तूं पाहिजे तें करण्यास समर्थ आहेस. तुझ्या इच्छेविरुद्ध जाण्याची आमची काय शक्ति!'

याप्रमाणें उदार व निरतिशय प्रीति करणाऱ्या राणी **वासवदत्तेनें** जिच्याकरितां राजा इतके दिवस एकसारखा तळमळत होता ती **प्रियदर्शिका** अर्पण करून, **राजाचे** मनोरथ पूर्ण केले, ह्यामुळें सर्वांना अतिशय आनंद झाला. नंतर राणी राजाला ह्मणाली, 'आर्यपुत्र, आणखी तुमचें काय प्रिय करावें तें सांगा.'

**वत्सराज** ह्मणाला, 'यापेक्षां आणखी प्रिय तें काय करायचें? **दृढवर्म्याला**, त्याचें गेलेलें सर्व राज्य पुनः प्राप्त झालें. तूं फार रागावली होतीस ती माझ्यावर प्रसन्न झालीस. ही तुझी प्रिय भगिनी **प्रियदर्शिका** नाहींशी झाली होती ती तुला जिवंतपणें भेटली; तेव्हां हे प्रियतमे, तुझ्याजवळ मागण्यासारखें दुसरें आणखीं माझें प्रिय तें कोणतें राहिलें आहे? तथापि असें होवो,—

इंद्र यथाकालीं वृष्टि करून पृथ्वीवर जिकडे तिकडे धान्याची समृद्धि करो! अनेक यज्ञयागादि कर्मं करून विद्वान् ब्राह्मण देवांची प्रीति संपादन करोत! आकल्प नेहमीं सज्जनांची अधिकाधिक संगति घडो! आणि दुष्ट मनुष्यांच्या, वज्रासारख्या दुःसह, दुरुक्ति निःशेष नाहींशा होवोत, हें माझें प्रिय आहे.'

ईश्वरकृपेनें सर्व कांहीं प्राप्त होईल असें **वासवदत्तेनें** सांगितलें. राजा **दृढवर्म्याला** **वत्सराजाच्या** कृपेनें पूर्वस्थिति प्राप्त झाली, तरी आपली प्रिय कन्या **प्रि-**

यदर्शिका वत्सराजाला द्यावी असा जो त्याचा हेतु होता तो, प्रियदर्शिका नाहींशी झाल्यामुळें पूर्ण झाला नव्हता. त्याच्यापेक्षां चोपदार विनयवसु याला फार दुःख झालें होतें. कारण प्रियदर्शिकेला त्यानें आपल्याच बुद्धीनें पळवून नेली होती, व तिचा वाईट परिणाम झाला, याबद्दल तो रात्रंदिवस दुःख करीत होता. सांप्रत तिचा शोध लागून दृढवर्म्याच्या मनांत होतें त्याप्रमाणेंच घडून आलें, हें पाहून विनयवसूच्या आनंदाला पारावार नाहींसा झाला. तो प्रियदर्शिकेच्या व राणी वासवदत्तेच्या आग्रहास्तव कांहीं दिवस तेथें राहून, मोठ्या संकटानें सर्वांचा निरोप घेऊन, परत आपल्या यजमानाकडे गेला, व दृढवर्म्याला हें आनंदकारक वर्तमान कळवून संतुष्ट केलें.

याप्रमाणें मोठा रंगेला व भाग्यशाली वत्सराज, आपल्या गुणानें व वात्सल्यानें प्रजेचें मनोरंजन करून व विलक्षण सामर्थ्याच्या प्रभावाच्या योगानें सर्व शत्रूंवर दरारा बसवून, राणी वासवदत्ता, पद्मावती, रत्नावली, प्रियदर्शिका व त्याचा जिवलग मित्र वसंतक, व यौगंधरायणादि प्रधान यांसहवर्तमान बहुत वर्षें सुखाचा अनुभव घेऊन मोठ्या आनंदानें कालक्षेप करिता झाला.



# पोतदारांचीं
## अतिस्वस्त शालोपयोगी व इतर पुस्तकें
### ह्यांविषयीं महत्वाची सूचना.

पोतदारांचीं सर्व प्रकारचीं शालोपयोगी व इतर पुस्तकें विक्रीस तयार आहेत. टपालखर्चसुद्धां रोख पैसा पाठविला असतां पुस्तकें ताबडतोब रवाना करूं किंवा 'व्हॅल्युपेएबल पार्सल' नें मागविलीं असतां तशीं पाठवूं. 'व्हॅल्युपेएबल पार्सल' नें मागविलीं असतां बंगीवर जो किमतीचा आंकडा लिहिला असेल तो पाहून तितके पैसे टपालांत भरले ह्मणजे झालें. 'व्हॅल्युपेएबल पार्सल' बद्दल मनी आर्डरचा जो खर्च, तोच सरकार घेतें. बाटेल त्या रीतीनें पुस्तकें मागवावीं. पुस्तकें उधार पाठविलीं जाणार नाहींत. 'व्हॅल्युपेएबल पार्सल' मागविलें असतां तें परत घेतलें जाणार नाहीं. अगोदरच विचार करून 'व्हॅल्युपेएबल पार्सल' मागवावें. तें परत आलें असतां त्याचा कायदेशीर रीतीनें बंदोबस्त करतां येतो. याकरितां अगोदरच खबरदारी घेतली तर बरें. 'बुकपोस्टा'नें बंगी पाठविली असतां ही रजिस्टर करीत जाऊं. रजिस्टर करण्याबद्दल दोन आणे चार्ज जास्त पडेल. रजिस्टर न करितां तशीच पाठवा असें लिहून आल्यास ती गहाळ झाली असतां त्याची जबाबदारी आम्हांवर नाहीं.

**विशेषसूचना**—पोतदारांचीं शालोपयोगी पुस्तकें फारच स्वस्त, सुबक, लहान मुलांस फारच उपयुक्त, लोकप्रिय व सुलभ अशीं असल्याबद्दल सर्वत्र प्रसिद्धि आहे. पुस्तकांचा कागद व छापणी हीं विशेष मोहरेदार असतात. सारांश, जेणेंकरून विषयाची दुर्बोधता घालवून सुबोधता आणवेल व पुस्तकें शाळांतील मुलांस अत्युपयोगी होतील अशी तजवीज केली आहे. पुस्तकांच्या किमतीच्या स्वल्पतेनें तर सर्व पुस्तकांस हटविलें आहे. एकदम पुष्कळ पुस्तकें घेणाऱ्या व्यापाऱ्यास भरपूर कमिशन मिळेल. कमिशनचे दर व पुस्तकांच्या वगैरे माहिती करितां अर्ध्या आण्याचें तिकिट पाठविलें असतां आमचा छापी क्याटलाग पाठवून देऊं.

| नं०. | पुस्तकांचीं नांवें. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| १६ | गद्यपद्यार्थ बोध भाग ३ रा अथवा मराठी ३ ऱ्या पुस्तकांतील कठिण शब्दांचे अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण ... ... | ३ | ० |
| १७ | गद्यपद्यार्थबोध भाग ४ था अथवा मराठी ४ थ्या पुस्तकांतील कठिण शब्दांचे अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण ... ... | ४ | ० |
| १८ | गद्यपद्यार्थबोध भाग ५ वा अथवा मराठी ५ व्या पुस्तकांतील कठिण शब्दांचे अर्थ व कवितांचें सान्वयस्पष्टीकरण ... ... | ८ | ० |
| १९ | हॉ० इं० पहिल्या पुस्तकांतील फक्त शब्दार्थसंग्रह. ... | १ | ० |
| २० | हॉ० इं० प० पुस्तकांतील शब्दार्थ व भाषांतर टीपांसह | २ | ६ |
| २१ | हॉ० इं० दु० पुस्तकांतील शब्दार्थ फ्रेजिससह ... ... | २ | ६ |
| २२ | हॉ० इं० सेकंड बुक सेकंड पार्टांतील शब्दार्थ फ्रेजिससह | ४ | ० |
| २३ | हॉ० इं० ति०पु० शब्दार्थ फ्रेजिससह | १० | ० |
| 24 | A Glossary of Sandford and Merton ... | 8 | 0 |
| २५ | रॉयलप्रायमर पुस्तकाचें सार्थस्पष्टीकरण ... ... | २ | ० |
| २६ | रॉयलरीडर नंबर १ चे शब्दार्थ फ्रेजिससह | २ | ३ |
| २७ | रॉयलरीडर नंबर २ चे शब्दार्थ फ्रेजिससह | ३ | ६ |
| २८ | रॉयलरीडर नंबर ३ चे शब्दार्थ फ्रेजिससह | ४ | ६ |
| २९ | रॉयलरीडर नंबर ४ चे शब्दार्थ फ्रेजिससह | ६ | ० |
| ३० | सिक्कल टु रॉयलरीडर नं० १ चे शब्दार्थ | २ | ६ |
| ३१ | सिक्कल टु रॉयलरीडर नं० २ चे शब्दार्थ | ३ | ६ |
| ३२ | सिक्कल टु रॉयलरीडर नं० ३ चे श० फ्रे० जिससह ... ... | ४ | ६ |
| ३३ | सिक्कल टु रॉयलरीडर नं० ४ चे श० फ्रेजिससह ... ... | ५ | ० |
| ३४ | मुंबईइलाख्यांतील सरकारी मोडी १ ल्या पुस्तकांतील शब्दार्थ व कवितान्वयार्थ ... ... | १ | ० |
| ३५ | ,, सरकारी मोडी २ ऱ्या पुस्तकांतील शब्दार्थ ... ... | १ | ० |
| ३६ | ,, सरकारी मोडी ३ ऱ्या पुस्तकांतील शब्दार्थ ... ... | १ | ६ |

| नं० | पुस्तकांचीं नांवें | आ. | पै. |
|---|---|---|---|
| 37 | A Hand-Book for young Students ... | 0 | 9 |
| ३८ | सर्व देशी व विलायती चालीच्या कोष्टकांचें पुस्तक ... | ० | ९ |
| ३९ | मार्कबुक, सर्व मराठी व इंग्रजी शाळांत चालणारें ... | ० | ६ |
| ४० | लेखनदीपिका अथवा मराठी शुद्ध लिहिण्याचे सोपे नियम | १ | ० |
| ४१ | व्याकरणबोध ... | २ | ० |
| ४२ | मराठी शब्दरूपावलि व धातुरूपावलि | १ | ६ |
| ४३ | सुबोधव्याकरण ... | ४ | ० |
| ४४ | वाक्यमीमांसा (प्रो० आगरकरकृत) ... | ९ | ० |

| नं०. | पुस्तकांचीं नांवें. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| | भाषांतराकरितां उतारे. | | |
| ४५ | चवथे इयत्तेकरितां | ३ | ० |
| ४६ | पांचवे ,, ... | ७ | ० |
| ४७ | सहावे ,, ... | ८ | ० |
| ४८ | सातवे ,, ... | ९ | ० |
| ४९ | धुळाक्षर शेंकडा १॥ दीड रुपया प्रत्येकास किंमत ... | ० | ६ |
| ५० | कित्ते मोडी नं० १ पासून नं० ६ पर्यंत व कित्ते बालबोध शेंकडा १॥ रु. दर कित्यास ... | ० | ६ |

धुळाक्षर व कित्ते शेंकड्यावर घेणारास वेगळें कमिशन नाहीं.

## मनोरंजक व नीतिपर पुस्तकें.

| नं० | पुस्तकांचीं नांवें. | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|---|
| १ | जर्मन भाषेंतील सुरस गोष्टी भाग १ | ० | १४ | ० |
| २ | जर्मन भाषेंतील सुरस गोष्टी भाग २... ... | १ | २ | ० |
| ३ | सुशिक्षितस्त्री. ... | ० | १० | ० |
| ४ | सुंदरी आणि वसंतसेन भाग १ (मूळ हिंदीभाषेंतील एका गोष्टीवरून रचिलेलें.) ... | ० | ४ | ० |
| ५ | सुंदरी आणि वसंतसेन भाग २ (सदरप्रमाणें.) ... | ० | ६ | ० |
| ६ | यशवंत विजया नाटिका. ... | ० | ४ | ० |
| ७ | सुंदराबाई (एक चटकदार गोष्ट.) | ० | १ | ० |
| ८ | चातुर्य रत्नावलि भाग १. ... | ० | ० | ६ |
| ९ | चातुर्य रत्नावलि भाग २. ... | ० | ० | ६ |
| १० | चातुर्य रत्नावलि भाग ३. ... | ० | ० | ६ |
| ११ | चातुर्य रत्नावलि भाग ४. ... | ० | ० | ६ |
| १२ | विचारमाला उपदेशपरवाक्यें ... | ० | ० | ६ |

| नं०. | पुस्तकांचीं नांवें | आ. | पै. |
|---|---|---|---|
| ३० | स्वप्नाध्याय ( प्राकृत अर्थासह शुद्ध केलेला ) | १ | ० |
| ३१ | अंगदशिष्टाई प्रकार १ ला | १ | ० |
| ३२ | अंगदशिष्टाई प्रकार २ रा | १ | ० |
| ३३ | दामाजीपंताचें चरित्र | १ | ० |
| ३४ | सोळा सोमवार कथा ओंव्या | १ | ० |
| ३५ | मारुतिजन्म ओंव्या | १ | ० |
| ३६ | गर्भावळी (गर्भकांड ओंव्या) | १ | ० |
| ३७ | समासचक्र | १ | ० |
| ३८ | समासचंद्रिका | १ | ० |
| ३९ | शब्दरूपावलि संस्कृत | १ | ० |
| ४० | बावनश्लोकी गुरुचरित्र ओंव्या | ० | ९ |
| ४१ | शिवकवच | ० | ९ |
| ४२ | शिवमहिम्नस्तोत्र | ० | ९ |
| ४३ | राममंत्राचे श्लोक | ० | ९ |
| ४४ | ज्ञानदेवकृत हरिपाठ | ० | ९ |
| ४५ | एकनाथकृत हरिपाठ. | ० | ९ |
| ४६ | चोविसनामाचे अभंग | ० | ९ |
| ४७ | नित्यपाठाचे अभंग. | ० | ९ |
| ४८ | शिवपाठाचे अभंग. | ० | ९ |
| ४९ | तुकारामकृत हरिपाठ | ० | ९ |
| ५० | गुरुपाठाचे अभंग | ० | ९ |
| ५१ | कबिराचीं पदें | ० | ९ |
| ५२ | पोतदारकृत नवीन संगीत आरत्या | ० | ६ |
| ५३ | जीवितस्तोत्र | ० | ६ |
| ५४ | रामरक्षा | ० | ६ |
| ५५ | ध्रुवाख्यान | ० | ६ |
| ५६ | द्रौपदीवस्त्रहरणाचे अभंग | ० | ६ |
| ५७ | एकाक्षरी श्लोक | ० | ६ |
| ५८ | तुकारामकृत स्वर्गारोहणाचे अभंग | ० | ६ |
| ५९ | संस्कृत तुळसीमाहात्म्य | ० | ६ |
| ६० | शिवापराधक्षमापन स्तोत्र | ० | ६ |
| ६१ | ज्योतिर्लिंग स्तोत्र. | ० | ६ |
| ६२ | गुरुदत्त पंचक | ० | ६ |
| ६३ | गणपतीचे श्लोक | ० | ६ |
| ६४ | शिवस्तुति | ० | ६ |
| ६५ | लक्ष्मीस्तोत्र संस्कृत | ० | ६ |
| ६६ | मारुतिस्तोत्र व भीमाष्टक | ० | ६ |
| ६७ | गणपतिस्तोत्र ओंव्या | ० | ६ |
| ६८ | मिराबाई चरित्राचे अभंग | ० | ६ |
| ६९ | स्थालीपाकाचे अभंग | ० | ६ |
| ७० | दुर्गास्तोत्र ओंव्या | ० | ३ |
| ७१ | चर्पटपंजरी | ० | ३ |
| ७२ | शिवरक्षा | ० | ३ |
| ७३ | देव्यपराधक्षमापनस्तोत्र | ० | ३ |
| ७४ | शिवमानसपूजा | ० | ३ |
| ७५ | शिवतांडवस्तोत्र | ० | ३ |
| ७६ | नवग्रहस्तोत्र | ० | ३ |
| ७७ | ज्वरस्तोत्र | ० | ३ |
| ७८ | संकष्टनाशनस्तोत्र | ० | ३ |
| ७९ | दत्तात्रेयस्तोत्र | ० | ३ |
| ८० | गोविंदाष्टक | ० | ३ |
| ८१ | गंगाष्टक | ० | ३ |
| ८२ | नर्मदाष्टक | ० | ३ |
| ८३ | अन्नपूर्णाष्टक | ० | ३ |

| नं. | पुस्तकांचीं नांवें. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| ८४ | सूर्यस्तुति ... ... | ० | ३ |
| ८५ | रामस्तुति ... ... | ० | ३ |
| ८६ | नारायणस्तोत्र ... | ० | ३ |
| ८७ | शनिस्तोत्र ... | ० | ३ |
| ८८ | कालभैरवाष्टक ... | ० | ३ |
| ८९ | मणिकर्णिकाष्टक ... | ० | ३ |
| ९० | बिंदुमाधवाष्टक ... | ० | ३ |
| ९१ | गजेंद्रमोक्ष प्राकृत. | ० | ३ |
| ९२ | लक्ष्मीस्तोत्र प्राकृत. ... ... | ० | ३ |

| नं. | पुस्तकांचीं नांवें. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| | स्त्रीपुरुषांनीं एकमेकांचीं नांवें घेण्याची पद्धत आणि मनोरंजक उखाणे व ह्मणी. | | |
| ९३ | भाग १. ... ... | ० | ३ |
| ९४ | भाग २. ... ... | ० | ३ |
| ९५ | भाग ३. ... ... | ० | ३ |
| ९६ | भाग ४. ... ... | ० | ३ |
| ९७ | हरिहराष्टोत्तरशतनामावलीस्तोत्र. ... | ० | ३ |

## प्राकृत ग्रंथ व पुस्तकें विक्रीस तयार.

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| सिद्धांतबोध ... ... | ६ | ० |
| भक्तलीलामृत ... ... | ५ | ० |
| ज्ञानेश्वरी ... ... | ४ | ८ |
| संतविजय ... ... | ४ | ० |
| नवनाथ भक्तिसार ... | ४ | ० |
| नवनाथ भक्तिसार ... | ३ | ० |
| एकनाथी भागवत ... | ५ | ० |
| पांडवप्रताप ... ... | ४ | ० |
| पांडवप्रताप ... ... | ३ | ० |
| पांडवप्रताप ... ... | २ | ० |
| भक्तविजय ... ... | ३ | ८ |
| भक्तविजय ... ... | २ | ८ |
| रामविजय ... ... | ३ | ० |
| रामविजय फळ्या व वेष्टणासह ... ... | २ | ० |
| रामविजय साधा ... | १ | ८ |
| रामाश्वमेध ... ... | ३ | ० |
| हरिविजय कागद ग्लेज | २ | ८ |
| हरिविजय कागद जाड व शब्दकोश ... ... | २ | ० |
| हरिविजय दुसरा ... | १ | ८ |
| हरिविजय बुक ... ... | १ | ८ |

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| संतलीलामृत ... ... | २ | ० |
| संतलीलामृत ( बुक ) ... | १ | ८ |
| नाथलीलामृत ... ... | २ | ० |
| दासबोध ... ... ... | २ | ० |
| दासबोध दुसरा ... | १ | १२ |
| दासबोध (पु० बांधलेलें) | १ | १२ |
| कथासारामृत ... ... | ३ | ० |
| जैमिनीअश्वमेध ... | ३ | ८ |
| जैमिनीअश्वमेध (बुक) ... | २ | ८ |
| श्रीगुरुचरित्र मोठें ... | ३ | ० |
| श्रीगुरुचरित्र लहान ... | १ | १० |
| श्रीगुरुचरित्र गुटका ... | २ | ० |
| काशीखंड ... ... | ४ | ८ |
| काशीखंड ... ... | ३ | ८ |
| शिवलीलामृत रेशमी बांधलेलें चित्रांसह ... | ० | ८ |
| शिवलीलामृत रेशमी गुटका ... ... | ० | ७ |
| गणेशलीलामृत सुटी पोथी | ० | ८ |
| " रेशमी बांधलेली ... | ० | १२ |
| पंढरीमाहात्म्य पोथी अध्याय ३१ ... ... | ० | १२ |

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| नासिकेतोपाख्यान ... | १ | ० |
| अर्जुनगीता प्राकृत ओवीबद्ध ... ... ... | ० | ४ |
| तुकाराम चरित्र ... | १ | ८ |
| भागवतसारामृत ... | ५ | ० |
| मूळस्तंभ लहान ... | ० | ४ |
| मळस्तंभ मोठा ... ... | २ | ० |
| विवेकसिंधु ... ... | १ | ४ |
| अमरसार ( संस्कृत इंग्रेजी आणि इंग्रेजी संस्कृत कोश) ... ... ... | १ | ४ |
| सरस्वतीमंडल ( ब्राम्हण लोकांचा इतिहास) ... | १ | ८ |
| भ्रमनिरास ' जशासतसें ' या पुस्तकाचें खंडण | ० | ८ |
| श्रीरामचरित्र गद्य ... | १ | ४ |
| श्रीकृष्णचरित्र गद्य ... | १ | ० |
| पांडवचरित्र गद्य ... | २ | ८ |
| विक्रमचरित्र गद्य ... | ० | १० |
| भारतेतिहाससार ... | १ | ० |
| सार्थगीता (भगवद्गीता मराठी टीकेसह रेशमी ) ... ... | ० | १२ |
| गीता सुबोधचंद्रिका ... | ० | १० |
| धर्मसिंधु ( संस्कृत म० भाषांतरासह ) ... | ६ | ० |
| तुकारामाचा गाथा ... | २ | ८ |
| कीर्तनतरंगिणी भाग १ ला. | ० | १४ |
| ,, ,, भाग २ रा. | १ | २ |
| ,, ,, भाग ३ रा. | ० | १४ |
| उपयुक्त कथासंग्रह भाग १ ला ... ... ... | २ | ० |
| उपयुक्त कथासंग्रह भाग २ रा ... ... | २ | ० |

| | कि. रु. | आ. |
|---|---|---|
| केसरींतील निवडक निबंध भाग १ ... ... | १ | ० |
| ,, ,, भाग २ ... | १ | ० |
| शिक्षणसार ... ... | ० | ९ |
| हरिविजय कथारस. ... | १ | ० |
| पांडवप्रताप कथारस. ... | १ | ४ |
| रामविजय कथारस. ... | १ | ४ |
| संतलीलामृत कथारस. ... | १ | ४ |
| भक्तिविजय कथारस. ... | १ | ४ |
| जैमिनिअश्वमेध कथारस. | १ | ८ |
| शिवलीलामृत कथारस. | ० | १० |
| राजपुत्र शूरसेन ... ... | १ | ० |
| हंसपालिका कादंबरी .. | १ | ८ |
| नारायणराव आणि गोदावरी ... ... ... | १ | ४ |
| वेणू (कादंबरी) ... ... | १ | ० |
| चंद्रकला (कादंबरी) ... | १ | ४ |
| बृहत्कथासागर भाग १ ला (कादंबरी) ... ... | २ | ४ |
| गुलबंकावली मराठी ... | १ | ४ |
| मंजुघोषा ... ... | १ | ४ |
| वसंतकोकिला ... ... | १ | ८ |
| मित्रचंद्र ... ... ... | १ | ४ |
| मदनमंजरी ... ... | २ | ० |
| विचित्रपुरी ... ... | २ | ० |
| विदुरनीति ... ... | ० | ४ |
| सिंहासनबत्तिशी .. ... | ० | ३ |
| वेताळपंचविशी .. ... | ० | ६ |
| स्त्रीचरित्र रामजी डाक्टर पैकीं भाग १।२।३।४ दर भागास ... ... | २ | ० |
| महाराष्ट्रभाषेंतील मनोरंजक गोष्टी भाग ५ प्रत्येकीं ... ... ... | १ | ८ |

वासुदेव मोरेश्वर पोतदार, कांदेवाडी, मुंबई.

# विनंति.

आम्हीं विद्वान् गृहस्थांकडून संस्कृत नाटकांच्या व काव्यांच्या आधारानें कादंबरीच्या पद्धतीवर मराठींत मनोरंजक सरळ गोष्टी लिहवून त्या "बालकुमारांची नीतिपर व मनोरंजक पुस्तकमाला" या नांवाखालीं प्रसिद्ध करण्याचा क्रम सुरू केला आहे. पुस्तकमालेंपैकीं १ कादंबरी. २ ललितवत्सराज (पूर्वार्ध). ३ ललितवत्सराज (उत्तरार्ध). ४ चारुदत्त आणि वसंतसेना. ५ प्रणयिमाधव. ६ आर्यचाणक्य. ७ विक्रमपुरूरवा. ८ राजा अग्निमित्र. अशीं हीं आठ पुस्तकें छापून तयार झालीं आहेत; व पुढें लिहिलेल्या पुस्तकांच्या सरळ गोष्टी लिहून तयार झाल्या असून त्या छापण्याचा विचार आहे. त्यांचीं नांवें:—(संस्कृत नाटकें)—१ विद्धसालभञ्जिका. २ मल्लिकामारुतम्. ३ मुदितमदालसम्. ४ नागानंदम्. ५ वेणीसंहार. ६ पार्वतीपरिणयम्. ७ कर्णसुंदरी. ८ सुभद्राहरणम्. ९ कर्पूरमञ्जरी. १० अभिज्ञानशाकुंतलम्. इत्यादि. (संस्कृत काव्यें)—१ दशकुमारचरितम्. २ हम्मीरचरितम्. ३ नवसाहसाङ्कचरितम्. ४ विक्रमाङ्कदेवचरितम्. ५ धर्मशर्माभ्युदयकाव्यम्. ६ नैषधचरितम्. ७ किरातार्जुनीयम्. ८ शिशुपालवधः. ९ रघुवंशम्. १० कुमारसंभवम्. ११ कादंबरी. १२ वासवदत्ता. याप्रमाणें ऐतिहासिक, नीतिपर व मनोरंजक अशीं (मूळचींच मराठीभाषेंत लिहिलेलीं, इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें व विद्वन्मान्य ग्रंथांच्या आधारानें लिहिलेलीं) नाटकें, कादंबऱ्या, सुरस गोष्टी, चरित्रें वगैरे पुस्तकें यांच्या मालेंत क्रमाक्रमानें गोंविण्याचा विचार आहे. अशा उत्तम पुस्तकांच्या वाचनानें [illegible] कर्मोन्मुख होऊन वाचकांचें मन सन्मार्गाकडे वळेल अशी खात्री आहे. अशा भांडारांतून उत्तम पुस्तकें निवडून तीं मराठीभाषेंत लिहून वाचकांस अर्पण करणें हें किती खर्चाचें काम आहे, हें सर्व सुज्ञ गृहस्थांनीं [illegible] आपला उदार आश्रय द्यावा, अशी विनंति आहे.

[illegible]देव मोरेश्वर पोतदार, कांदेवाडी, मुंबई.